


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष १ — अं. १ ते ४
आणि अं. २ : २
१९२८ – २९.

| | | | |
|---|---|---|---|
| वर्ष १ ले, | अंक १ ला | मार्च १९२८ | (त्रैमासिक) |
| ,, ,, | ,, २ रा | जून १९२८ | ,, |
| ,, ,, | ,, ३ रा | सप्टेंबर १९२८ | ,, |
| ,, ,, | ,, ४ था | जानेवारी १९२९ | ,, |
| ,, ,, | अंक १ ला | मार्च १९२८ | |
| ,, ,, | ,, २ रा | जून १९२८ | |
| ,, ,, | ,, ३ रा | सप्टेंबर १९२८ | |









महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# [म]हाराष्ट्र-साहित्य-पत्रिका


[पु. १ लें.] चैत्र शुद्ध १ शके १८५० [अंक १ ला

गुरुवार, ता. २२ मार्च सन १९२८


६-७ ८

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



मार्च १९२८

इच्छिणार नाहीं असें तरी कसें म्हणावें ? अर्थात् अशा या सामुदायिक मासिकाला सामुदायिक साहाय्य मिळणें इष्ट तसेंच आवश्यकहीं आहे. व तसें तें मिळाल्यावांचून राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे; कारण

संहतिः कार्यसाधिका

आतां पहिल्या प्रतीचें मासिक कसें काढतां येईल याचा विचार करूं लागल्यास आमच्या मतें स्वतंत्र विचारांनीं व माहितीनें भरलेल्या मासिकाचा दर्जा केव्हांही श्रेष्ठ ठरलाच पाहिजे. इंग्रजी ग्रंथांवरून घेतलेली माहिती व त्या ग्रंथांवरून सुचलेले विचार यांनीं मासिकाचीं पृष्टें भरून काढण्याची कल्पनासुद्धां मनांत येतां कामा नये. नवीन, अपूर्व असेंच वाचकांस वाचण्यास मिळालें पाहिजे. आमची हांव कोणतीही मर्यादा ओळखत नसली तरी आमच्या कृतीला अवनत अशा राजकीय परिस्थितीचा अनुल्लंघनीय बंधारा पडलेला आहे हें आम्ही विसरलों नाहीं. उदाहरणार्थ नाणक शास्त्रांतील एक प्रश्न घेऊं रुपयाची झीज किती होते हें आपणांस स्वतः ठरवतां कसें येणार ? आपल्या लोकांना ॲसे-मास्तरांच्या जागा मिळतील तेव्हांच अशा गोष्टी शक्य होतील. तथापि या मर्यादा लक्षांत घेऊनही आपणांस पुष्कळ करतां येण्यासारखें आहे. मात्र परिश्रम करणारी मंडळी पुढें आली पाहिजेत. **समाजशास्त्राला** हिंदुस्थानांत जितकी वाव आहे तितकी अन्यत्र क्वचितच असेल. या देशांत अनेक जाति व तितकेच वस्तुतः धर्म असल्याकारणानें, निरनिराळ्या जातींच्या निरनिराळ्या चालीरिती व समजुती असतात. त्यांचा शोध करणें, वर्गीकरण करणें व संगति लावणें, हें कार्य आपणांस करतां येण्याजोगें आहे. या कामींही इंग्रजी ग्रंथांकडे आपणांस बघावें लागतें, ही अत्यंत मानहानिकारक स्थिति आहे. समाजशास्त्र हा शब्द उच्चारल्यानें कोणीही बुचकळ्यांत पडण्याचें कारण नाहीं. आमच्या मासिकांत आम्हीं अनेक सदरें पाडूं. त्या सदरांखालीं कोणालाही माहिती पुरवितां येईल. कारण तीं सदरें सर्वांना परिचित अशीं असतील. उदाहरणार्थ, लग्नविधि या सदराखालीं वेगवेगळ्या जातींत प्रचलित असलेले विवाहप्रकार देतां येतील. अंत्यसंस्कार या सदराखालीं निरनिराळ्या लोकांचे अंत्यविधी विवरितां येतील. लौकिकदंतकथा ( Folk-lore ) या मथळ्याखालीं अनेक लोकांत रात्रंदिवस सांगितल्या जाणाऱ्या अलिखित कहाण्या, कथा, गोष्टी या देतां येतील. दृष्ट काढण्याचे प्रकार एकत्र करून लोकांस सांगतां येतील; जातींच्या उच्चनीच, समत्वाच्या कल्पना ज्यांच्यावरून अनुमित होतील अशा चाली आपणांस एकत्र करतां येतील.

समाजशास्त्राप्रमाणें **अर्थशास्त्रावरही** स्वतंत्र तऱ्हेचें लिखाण करतां येणार नाहीं असें नाहीं. आपल्याकडे कांहीं ठिकाणीं पैसा विपुल नसतांही, व्याजाचा दर कमी

असें लिहिणें चुकीचें होईल. विशेषतः नेहमीं न येणारे असे शब्द 'औपचारिक' इत्यादि उपान्त्य ऱ्हस्व जसे मुळांत आहेत तसेच लिहावे. या बाबतींतहि हल्लीं बराच भिन्न प्रघात दिसतो. 'ठराविक' 'ठरावीक' लिहिलें तरी चालेल, कारण हा शब्द निव्वळ मराठी आहे; पण 'प्रासंगिक' बोल या ठिकाणीं प्रासंगीक लिहिणें सद्भिरुचीला सोडून होईल.

ऱ्हस्वदीर्घाच्या विचारानन्तर अनुस्वाराचा विचार साहजिक येतो. मराठीच्या लेखनांत अनुस्वार पुष्कळ घुसले आहेत ते कोंकणस्थांचे स्मारक होत असें कित्येक समजतात; पण तें तसें नसून मूळच्या संस्कृतांतील म् किंवा न् यांचे स्मारक आहेत अशी आतां बहुतेकांची खात्री झाली आहे. अनेक वचनीं 'नामांच्या' रूपांत अनुस्वार पाहिजे. नपुंसकलिंगी क्रियापदांच्या रूपांत अनुस्वार पाहिजे हें तत्त्व आतां ठरून गेलें आहे तें योग्यच आहे. 'गतं' याचें हें शेष आहे हें सांगावयास नको. मी वर मात्र अनुस्वार घाला, अहंची स्मृति आहे; किंवा देऊं नका, कारण अनुस्वार मकारांत आला. 'येथें' 'तेथें' यावर अनुस्वार असावा 'यस्मिन्' 'तस्मिन्' यांतील नचा अवशेष आहे वगैरे उदाहरणं ( उदाहरणानि ) देतां येतील. रामानें यांतील नेवर अनुस्वार देण्याची रीत आहे, तिचें मूळ काय आहे तें कदाचित् संशयात्मक असेल. पण 'रामें' असें तृतीयान्त रूप येतें त्यांत अनुस्वार पाहिजे; कारण तो रामेण यांतील ण चा शेष आहे. जातां, करितां, साठीं, इत्यादि शब्दांत, त्याचप्रमाणें 'शेवटीं' 'रामीं रंगलें' 'गांवीं गेलों' इत्यादि सप्तम्यन्त नामांत अनुस्वार असावा, कारण येथेंहि स्मिन्‌चा अवशेष दिसतो.

तथापि कांहीं शब्दांत अनुस्वार देण्याची प्रथा विनाकारण पडली आहे, तो कोंकणस्थांचा प्रसाद आहे असें कोणी म्हटल्यास चालण्यासारखें आहे. सुरूं, चालूं, हळूंहळूं असें लिहिण्याचा बहुतेक सर्वत्र प्रघात दिसतो; पण तो अगदीं चुकीचा आहे असें मला वाटतें. असा सानुस्वार आपण उच्चारहि करीत नाहीं आणि सानुस्वार उच्चारास मूळहि नाहीं. सर्व ऊकारांत धातुसाधित अव्ययांवर अनुस्वार पाहिजे. बोलूं लागलों, करूं इच्छितों इत्यादि ठिकाणीं अनुस्वार पाहिजे, कारण तो वक्तुं कर्तुं या मूळ शब्दांतील अवशेष आहे. सुरू, चालू, हळूहळू हीं धातुसाधित अव्ययें वाटून हा प्रघात पडला असावा. पण सुरू यांत सुरधातु नाहीं. हा शब्द अस्सल फारशी आहे व अनुस्वाररहित आहे. चालू हें चाल धातूचें अव्यय असेल तेव्हां अनुस्वार पाहिजे. पण 'चालू' वहिवाट येथें तें विशेषण आहे; येथें अनुस्वार असणें शक्य नाहीं. हळूहळू हें मूलभूत अव्ययच आहे, त्यांत हळु हा धातु नाहीं. 'हलूं नको' येथें अनुस्वार पाहिजे. असो, व्युत्पत्ति पाहतां आणि लोकांचा उच्चारहि पाहतां, सुरू, चालू, व हळूहळू या शब्दांवर अनुस्वार देण्याचं कारण नाहीं.

वरील तीन शब्दांप्रमाणें आणखी तीन विशिष्ट शब्दांसंबंधें हल्लीं लिहिण्यांत बराच घोटाळा दिसतो; ते शब्द हि, कोणता आणि एखादा हे होत. या संबंधानें थोडें विस्तृत विवेचन करूं. 'तोहि गेला' येथें हि ऱ्हस्व न लिहितां अनेक लेखक दीर्घ लिहितात. हें निःसंशय चूक आहे असें मी म्हणत नाहीं. पण हि असेंच लिहावें असें माझें मत आहे. प्रत्यक्ष उच्चार आपण काय करतों हें इतर ऱ्हस्व स्वरान्त शब्दांप्रमाणें निश्चित सांगतां

येणार नाहीं. तसेंच हा शब्द संस्कृत हि वरून निघालेला नाहीं हें खरें आहे. मराठींतील ' च ' आणि संस्कृत ' च ' हे जसे अत्यन्त भिन्नार्थी आहेत त्याचप्रमाणें मराठी हि आणि संस्कृत हि भिन्नार्थ आहेत. मराठी हि संस्कृत अपि अर्थी आहे आणि ' अपि ' वरूनच निघाला-आहे. येथें व्युत्पत्तीसाठीं हिन्दीचें साहाय्य घ्यावें लागतें. ' अपि ' हिंदींत ' भी ' रूप पावलें म्हणजे एक हकार त्यांत शिरला. अशिष्ट लोकांची ही प्रवृत्ति अन्यत्रहि दिसून येते. कंदिलच्या ऐवजीं ते खंदिल म्हणतात हें बारीक लक्ष दिलें असतां दिसेल. ' सोपि गतः ' चें हिन्दींत ' वो भी गया ' असें झालें. ( अशिष्ट मराठींत वि होतो ) भी चा मराठींत हकार मात्र राहिला. ही सुद्धां प्राकृत लोकांच्या भाषांची प्रवृत्ति आहे. संस्कृतांतील घ, ध, भ, यांचे ठिकाणीं फक्त ह प्राकृतांत राहतो. मराठींत ही केलें तरी चालेल हें खरें; पण मूळचें रूप अपि ऱ्हस्व असल्यानें हि असेंच लिहिणें बरें दिसतें. शिवाय ' हीहि ' अशा प्रयोगांत सर्वनाम आणि अव्यय यांचें रूप भिन्न दिसणें युक्त आहे. कोणता हा शब्द अलीकडे पुष्कळ ' कोणचा ' असा लिहूं लागले आहेत व तें निव्वळ चुकीचें आहे. मूळ शब्द ' कोण ' त्याला ता प्रत्यय कसा लावला याची व्युत्पत्ति पाहतां ती हिंदींतून समजेल. ' कोनसा ' असा शब्द हिंदींत आहे तो कीदृशः या संस्कृतांतील ' श ' चा शेष आहे. स चा त होतो याचीं कित्येक उदाहरणें आहेत. ' कोनसा ' च्या अनुरूप मराठींत कोणता शब्द झाला. ' त ' चा हि ' च ' होतो या स्वाभाविक बदलानें हल्लीं कित्येक लोक ' कोणचा ' ' कोणच्या ' असें बोलूं व लिहूं लागले आहेत. मराठींतील षष्ठीचा ' च ' राजवाड्यांनीं ' त्य ' वरून व्युत्पादिला आहे त्या मार्गानें हा बदल होऊं पहात आहे; पण पूर्वीं ' ही ' व 'हि' याप्रमाणेंच षष्ठ्यन्त रूपापासून 'कोणत्या' हें रूप भिन्न ठेवलें पाहिजे. प्रत्यक्ष बहुतेक सार्वत्रिक उच्चारांत हल्लीं तें भिन्न आहेच. ' एखादा ' शब्दाची व्युत्पत्ति लक्षांत न आल्यानें कित्येक एकादा असें लिहितात, पण तें अगदींच चूक आहे. याचीहि व्युत्पत्ति हिंदीवरून लागते. हिन्दींत ' एक आधा ' असें म्हणण्याचा प्रघात आहे. ' एकाधा ' यांतील हकार मागें जाऊन एखादा रूप झालें आहे. जसें स्कंध, कंध याचें खांदा असें रूप मराठींत झालें आहे, तसें एकाधा याचें एखादा झालें आहे. तात्पर्य ' एखादा ' असेंच रूप शुद्ध आहे व असाच आपण उच्चार हि करतों; त्यांत दुरुस्ती करण्याची अवश्यकता नाहीं.

या विशिष्ट शब्दांचा विचार केल्यावर कांहीं सामान्य विचार कित्येक मराठी शब्दांचा आपल्यासमोर येतो. मराठी बोलणारांनां प्राचीन काळापासून दोन अक्षरांचें म्हणजे उच्चारांचें मोठें प्रेम दिसतें. पहिलें अक्षर ण. महाराष्ट्रींत ण फारच येत असे. ' नस्य णत्वं ' असें सूत्रच वररुचीनें दिलें आहे. ' णमण ' (नमन) ' णयण ' ( नयन ) असे उच्चार व तदनुषंगानें लेखन महाराष्ट्रींत होत असे. मराठीनें संस्कृत तत्सम शब्दांचा अवलंब केल्यानें ही प्रवृत्ति पुष्कळ कमी झाली आहे. तरी जे महाराष्ट्रींतून आलेले शब्द भाषेंत स्थायि झाले आहेत ते बदलले नाहींत व बदलूं नये हें उघड आहे. हिंदींत ' पानी ' ' करना ' इत्यादि शब्दांत नकार आहे तर मराठींत ' पाणी ' ' करणें ' इत्यादि णकार आहे. महाराष्ट्रींतील किंवा अपभ्रंशांतील काव्यादिकांत ' ण ' ची रेलचेल पाहून

हल्लीं आपल्यास हसूं येतें. पण मराठी बोलणारांचा हा फार प्राचीन स्वभाव आहे यांत शंका नाहीं. शुक्ल यजुर्वेदी महाराष्ट्र ब्राह्मण ऋग्वेदी ब्राह्मणांइतके महाराष्ट्रांतले जुने रहिवासी नाहींत हें त्यांच्या बोलण्यांत 'ण' कमी येतो यावरून म्हणतां येतें. आमचे एक स्नेही अशा भाषेची " शेनी लोनी तथा पानी रेनुका कनिक भक्षिनी " असा श्लोकार्ध म्हणून थट्टा करीत असत. भाषेंतील उच्चार हजारों वर्षे त्या त्या लोकांत किंवा प्रांतांत कसे कायम राहतात हें पाहून कधीं कधीं मौज वाटते. बंगाल्यांत षकार तर महाराष्ट्रांत सकार व णकार अधिक आहेत. संस्कृतांत न चा ण रषानंतर होतो; पण मराठींत तो रषाच्या सान्निध्याशिवाय 'पाणी' 'कोणी' इत्यादि शब्दांत दिसतो. असो, कोणत्या ठिकाणीं न वापरावा व कोणत्या ठिकाणीं ण हें केवळ आपल्या बोलण्याच्या प्रघातावर अवलंबून आहे. उदाहरणार्थ नें चें तृतीयारूप णें होत नाहीं तथापि कधीं कधीं त्याणें केलें असें लिहिलेलें आपल्यास दिसतें. पण हें फक्त हा व तो या सर्वनामास लागू आहे. हिनेंच्या ऐवजीं हिणें असेंहि उच्चारलेलें आपण ऐकितों; पण येथें तेंच लिहिणें शुद्ध समजलें जावें. 'तेणें-करून' या शब्दांत मात्र नें बरोबर लागत नाहीं. असो, संस्कृत शब्द शुद्ध लिहून केवळ मराठी झालेले शब्द बहुजनसमाजाच्या बोलण्यानुरूप 'पाणी' 'लोणी' असेच शुद्ध समजावे. आणि 'त्याणें' इत्यादि लिहिण्याचा प्रघात सोडावा असा नियम सर्वमान्य होईल असें मला वाटतें.

णकारापेक्षां ळकाराची अधिक मौज आहे. हें अक्षर व हा उच्चार संस्कृतांत नाहीं व अन्य हिंदी वगैरे देशी भाषांत नाहीं. तो महाराष्ट्रीयांतच दृष्टीस पडतो. तो इतका जुना आहे कीं ऋग्वेदाच्या पठनांतहि तो घुसला आहे. पाणिनीच्या अक्षर-समाम्नायांत तो नाहीं तरी तो पाणिनीहून पूर्व अशा शाकलशाखेंत आहे; व ही शाखा महाराष्ट्रांतच उत्पन्न झाली असा सिद्धांत काढल्यास वावगें होणार नाहीं. हा ळ णप्रमाणें द्राविडी भाषांच्या संपर्कानें आला असें दिसतें. महाराष्ट्रीयांत ( आणि हिंदुस्थानी यांत गुजराथ्यांतहि ) द्राविडी रक्ताचें मिश्रण आहे असें वंशशास्त्रावरून जें अनुमान काढतात त्यास यानें बळकटी येते. या प्रश्नाशीं आपला येथें जास्त संबंध नाहीं. पण ळ चा उच्चार कोणत्याहि आर्यभाषेंत नसल्यानें तो द्राविडी भाषांतून त्यांच्या निकट सान्निध्यानें महाराष्ट्रांत आला इतकें तरी उघड आहे. त्याचें कारण मात्र मराठींत निराळें झालें आहे. वैदिक शाकलसंहितेंत ड मध्यवर्ति असेल तेथें ळ होतो. पण मराठींत लच्या ठिकाणीं ळ होतो. मराठीला ड चें वावडें नाहीं, ल चें आहे. हें वळण महाराष्ट्रींतून आलें असें दिसत नाहीं. तसें असलें तरी महाराष्ट्रीला हें नवें वळण कोठून आलें हा प्रश्न राहणारच. मराठींत ड वाटेल तितका आहे किंबहुना इकडे तिकडे हे मराठीचे उच्चार कसेसेच वाटून हिंदी बोलणारे मराठीला इकडं तिकडं म्हणतात. मराठीला मध्यवर्ती ड सुद्धां चालतो; 'तडाखा' 'बोडका' असे अनेक शब्द मराठींत आहेत. परंतु ल मात्र मराठीला सोसत नाहीं. बळ, प्रळय, अचपळ इत्यादि शब्द संस्कृतांतील ल बदलून झाले आहेत. अनादेः हें सूत्र मात्र वररुचीचें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. मराठीला प्रारंभींचा ल वावडा नाहीं. लबाडी, लांब इत्यादि शब्दांत लकार कायम आहे. मध्यवर्ती किंवा अन्त्य ल बहुतेक ळ

झालेला दिसतो. 'डलयोः सावर्ण्य' असें एक सूत्र ऐकतों आणि ल चा ळ या मार्गानें 'तडाग' या संस्कृत शब्दांचें हिन्दींत तलाव झालें आणि मराठींत तळें झालें. असो, वरील इतिहासावरून मराठींत या बाबतींत शुद्धलेखन कोणतें समजावें याविषयीं नियम घालतांना जेथें शिष्ट पुरुष किंवा आप्तग्रंथकार ळ वापरतात तेथें ळच शुद्ध आहे असें समजणें योग्य होईल. प्रारंभीं दिलेल्या या नियमांचें येथें मोठें महत्त्व आहे. ळ कोकणांतील कुळंबी वापरीत नाहींत हें पाहून हे लोक द्रविडवंशी आहेत हें खरें काय या बद्दल शंका येते. हे लोक नारिएल असा शुद्ध महाराष्ट्री शब्द अजून वापरतात आणि ब्राह्मण त्यांस उगीच हंसतात. कारण नारळ हाच शिष्टांचा उच्चार अशिष्ट आहे असें ऐतिहासिक रीत्या म्हणावें लागतें. पण मला वाटतें घाटावरचे शेतकरी मराठे नारळ असाच शब्द वापरतात. तुकाराम रामदासांनीं 'आपुलिया बळें' 'अचपळ मन माझें' इत्यादि वाक्यांत ळ च वापरला आहे. तेव्हां बळ, काळ, वेळ, प्रळय, इत्यादि शब्द ळकार युक्त शुद्ध आहेत असेंच मानलें पाहिजे. जेथें भाषागौरवार्थ, मुख्यतः समासांत, हे शब्द येतील तेथें संस्कृत शुद्ध शब्द वापरावा. बळवर्धक हें शुद्ध न मानतां बलवर्धक हेंच शुद्ध मानावें. कालमाहात्म्य, प्रलयकाल, ग्रहणस्पर्शवेला, इत्यादि आणखी उदाहरणें देतां येतील.

मराठींत अलीकडे मंडळ शब्दाचा बराच उपयोग होऊं लागला आहे. तो मंडळ असाच लिहिणें शुद्ध समजलें जावें. 'इतिहाससंशोधक मंडळ' 'कार्यकारी मंडळ' इत्यादि शब्दप्रयोगांत ळघटित रूपच शुद्ध समजलें जावें. परंतु अन्यत्र विशेषतः समासांत संस्कृत शब्दाबरोबर मंडल असेंच पद लिहिणें प्रशस्त अर्थात् शुद्ध समजलें जावें. सूर्य-मंडलाचा भेद करून रणांत मेलेल्या वीरांचा आत्मा जातो. अशासारख्या शब्दप्रयोगांत मंडल शब्द शुद्ध समजला जावा. रामदासांनीं 'असा सर्व भूमंडळीं कोण आहे' असें लिहिलें हें खरें. पण रामदासांचें लिखाण विशेषतः अशिष्टांकरितां आणि खडखडीत भाषेंत मुद्दाम लिहिलेलें दिसतें. त्या काळाला आणि हल्लींच्या काळाला शिक्षणाच्या बाबतींतहि सामान्य लोकांत बराच फरक पडला आहे. यासाठीं रामदासांच्या अनुकरणानें हल्लीं गद्यांत 'वेर्थ' लिहिणें योग्य होणार नाहीं; 'व्यर्थ' असेंच लिहिणें शुद्ध समजलें जाईल. शिवाय भूमण्डळ हा मराठी शब्द घटित समास समजतां येईल, आणि तो तसा हल्लींहि लिहिणें अयोग्य समजलें जाऊं नये. असो, मण्डळ शब्दाची विशेष चर्चा केली याच अनुरोधानें इतर कित्येक शब्दांसंबंधें शुद्ध कोणतें रूप लिहावें हें समजेल.

मराठींत ण आणि ळ याहूनहि आणखी दोन तीन अक्षरांचें व उच्चारांचें प्राबल्य आहे त्याचा आपण शेवटीं विचार करूं. हे उच्चार संस्कृतांत मुळींच नसून ते कानडी भाषेंत नाहींत; त्यामुळें ते मराठींत कसे आले हा एक शोधनाचा प्रश्न आहे. चौकशी-करितां तेलगू भाषेंत हे उच्चार आहेत असें समजलें आणि त्यांची स्थिति त्या भाषेंत मराठी सारखीच आहे. म्हणजे च, ज ( यकाररहित ) आणि च, ज ( यकारोच्चारसहित ) दोन्ही तेलगूंत असून केवळ द्राविडी शब्दांत पहिले उच्चार आहेत आणि केवळ संस्कृत शब्दांत दुसरे उच्चार आहेत ( मीरिस-तेलगू-व्याकरण ). हा च वर्गाच्या उच्चाराचा भेद

तेलगूभाषेच्या संपर्कानें महाराष्ट्रांत आला असें ठरतें. इतिहासहि यास अनकूल दिसतो. शातवाहनांच्या वेळीं आंध्रांचें राज्य महाराष्ट्रावर होतें. पण महाराष्ट्रांत च नाहीं याचें आश्चर्य वाटतें. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं ळ प्रमाणें केवळ घाटावरच याचें प्राबल्य नसून गोव्यापासून नागपूरपर्यंतच्या सर्वंध महाराष्ट्रांत याचें प्राबल्य आहे. षष्ठी प्रत्ययांतील च सर्वत्र यकारोच्चाररहित आहे. इ व य पुढें आला असतां मात्र हा तीक्ष्ण उच्चार कायम रहात नाहीं, पुढच्या यकारोच्चारानें तो नरम होतो.

ळ पेक्षां आणखी एका गोष्टींत याचें वैगुण्य असें कीं ळ चा जसा भेद ल पासून भिन्नाक्षर उत्पन्न करून मराठीनें दाखविला आहे तसा च चा च पासून भेद दाखविण्यासाठीं मराठी लिपीनें कांहींच व्यवस्था केलेली नाहीं. बालबोध लिपींत प्रत्येक उच्चाराला निराळें अक्षर आहे ही या लिपीची जगांतील लिपींहून श्रेष्ठता आहे. पण च व च हा भेद दाखविणारे अक्षरभेद किंवा कांहीं चिन्हभेद नाहींत. यामुळें मराठीच्या शुद्धवाचनांत पुष्कळ वेळां गडबड होते. हिंदींत आरबी ख व ज चा उच्चार भिन्न दाखविण्यासाठीं ख़ ज़ अशीं चिन्हें उपयोगांत आणतात त्याप्रमाणें मराठींत उपयोगांत आणल्यास वाचणाराचा कधींच घोंटाळा होणार नाहीं, ही अडचण परभाषी लोकांची विशेष; मराठी मातृभाषा असलेल्यांची नाहीं, कारण कोठें च असा उच्चार आहे तें त्यांस लहानपणींच कळतें. तथापि अशा लोकांतहि कित्येक शब्दांच्या उच्चारांत भिन्न प्रकार दिसतो. तेव्हां शुद्ध उच्चार कोणता, निदान शुद्ध उच्चार कोणता मानावा याजविषयीं ज्यास्त ऊहापोह करणें अवश्य आहे. भेदचिन्ह करण्याचें ठरल्यास कोठें च लिहावें व कोठें च़ लिहावें याचाहि उलगडा यावरून होईल.

सामान्य सिद्धान्त असा प्रथम दिसतो कीं संस्कृत तत्सम शब्दांत च असाच् उच्चार असतो. याचें उदाहरण उच्चार हेंच् आहे. हें ज़री खरें आहे तरी मराठींत संस्कृत शब्द पूर्ण रूढ झाले कीं मराठी त्यांवर आपली छाप बसविते. आश्चर्य हें कीं च वर्गाच्या उच्चारांत छ मात्र नित्य यकारोच्चारसहित येतो. भानगड च, ज, आणि झ चीच् आहे. सूचना हा शब्द संस्कृत आहे तरी पण पुष्कळ वेळां च़ असा उच्चार ऐकूं येतो. अशा ठिकाणीं विकल्प आहे असें ठरवावें. संस्कृतोत्पन्न तद्भव शब्द च़ ज़ असेच् उच्चारावे व लिहावे. ज़सें ज़री ( यद्दि ) ज़ावई ( जामात ) इत्यादि अनेक उदाहरणें देतां येतील. पण यांतहि कित्येक स्थळीं विकल्पच मानावा लागेल. महत्त्वाचें उदाहरण ‘ पाहिजे ’ या शब्दाचें आहे. हा संस्कृतोत्पन्न ( द्रष्टव्य पासून ) आहे. करिजे वगैरे अन्य उदाहरणें आहेत. येथें ज़ ( यकारोच्चाररहित ) असा उच्चार ऐकूं येत नाहीं. अलीकडे मात्र कित्येक लोक पाहिज़े असा शब्दोच्चार करितात. तो अशुद्ध आहे असें वरील नियमानुसार म्हणतां येणार नाहीं. पण याहि बाबतींत विकल्प मानल्यास चालेल. तिसरें निव्वळ मराठी शब्द मग ते मूळचे संस्कृतांतून किंवा अन्य फारशी वगैरे भाषांतून आलेले कां असेनांत. च़ ज़ असेच् उच्चारावे. 'च़ब' 'ज़ब' 'चोर' 'महाज़न' इत्यादि शब्द संस्कृतोत्पन्न असले तरी ते आपली उत्पत्ति अगदीं विसरलेले आहेत यामुळें त्यांस मराठीचें विशिष्ट रूप द्यावें. चाकू, चमचा हीं उदाहरणें फारशी किंवा आरबींतून

आलेल्या शब्दांचीं आहेत. येथें हें सांगितलें पाहिजे कीं फारशींत च् नाहीं केवळ च संस्कृतासारखा आहे. पण त्यांत ज़ व ज असे दोन्ही उच्चार आहेत इतकेंच नव्हे तर भिन्न अक्षरेंहि याकरितां आहेत. जला जीम हें एकच अक्षर आहे तर ज़ साठीं ज़ाल ज़े ज़्वाद ज़ो अशीं चार अक्षरें आहेत. या चारी अक्षरांनीं ज़च्या उच्चारांत कांहींहि भेद उत्पन्न होत नाहीं. कोणत्या ठिकाणीं ह्यांपैकीं कोणतें अक्षर लिहावयाचें हें विद्वत्तेच्या परीक्षेसाठीं साधन या लिपींत ठेविलें आहे असें दिसतें. तेव्हां फारशी शब्द जकारयुक्त मराठींत आलेले कसे उच्चारावे हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. सोपा नियम असा घालतां येतो कीं सर्वच मराठीच्या रखरखित ज़ च्या स्वरूपांत उच्चारावे. उदाहरण ज़नावर हा शब्द फारशींत जान्वर असा आहे. मराठींत कित्येक लोक जनावर असा उच्चार करतात; पण तो मराठीच्या उच्चारास शोभत नाहीं. विशेषतः ज्यास फारशी शब्दांची माहिती नाहीं आणि कोठें ज़ आहे व कोठें ज आहे हें ठाऊक नाहीं त्यानें सरसकट ज़ असाच उच्चार करावा. मंज़ूर शब्दाची मोठी मौज होते. कित्येक लोक मंजूर म्हणजे संस्कृत ज प्रमाणें उच्चार करतात तो अगदींच चुकीचा आहे. मुळांत तो मंज़ूर असा मराठींतील ज़ सहित आहे तेव्हां हा उलट उच्चार मराठीलाहि शोभत नाहीं आणि फारशी जाणणाऱ्यालाहि त्रास देतो. तेव्हां भेद माहित असेल त्यानें भेद वाटेल तर ठेवावा, पण साधारणपणें संस्कृताशिवाय इतर भाषांतून आलेले शब्द मराठी ज़ च्या उच्चारानें उच्चारावे. दुसरी गोष्ट अशी कीं फारशींत ज असला तरी मराठींत ज़ उच्चारण्यानें कांहीं भाषाभेदहि दृष्टीस पडतो. मौज़ व मौज फौज़ व फौज असे भिन्न उच्चार मराठी व हिंदी शब्दांत ठेविले असतां भाषेंत एक प्रकारची भिन्नतेची मौज़ दृष्टीस पडेल.

वरप्रमाणें मराठी शुद्ध लेखन व उच्चारण यासंबंधीं कांहीं महत्त्वाचे नियम माझ्या अल्प समजुतीप्रमाणें मीं मराठी तज्ज्ञांपुढें ठेविले आहेत. मराठी भाषेवर इतर भारतीय संस्कृतोत्पन्न भाषांपेक्षां द्राविडी भाषांचा जास्त परिणाम झाला असला तरी मराठीची प्रकृति संस्कृत असून होतां होईल तितकें संस्कृताला जवळ असें तिचें लेखन व उच्चारण ठेवण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. विशेषतः तिची लिपि शुद्ध देवनागरी असल्यानें असा प्रयत्न सहज होण्यासारखा आहे. मराठी भाषेला पूर्व व दक्षिण, द्राविडी भाषांचा संपर्क असला तरी तिचें शुद्ध स्वरूप पुष्कळच राहिलें आहे. पोटभाषा व प्रान्तानिहाय भिन्न उच्चार असले तरी सर्वत्र हल्लीं वर्तमानपत्रांच्या योगानें व प्राचीन व अर्वाचीन आप्त वाङ्मयाच्या जास्त प्रसारानें सर्व ठिकाणीं लेखी मराठीला एकरूप येऊं लागलें आहे. सर्वत्र तुकाराम, रामदास, मोरोपंत, चिपळोणकर, टिळक इत्यादिकांच्या लेखनपद्धतीचा पगडा बसणें हल्लींच्या काळीं अपरिहार्य आहे व इष्टहि आहे. कारण भाषेचें विशेषतः लेखी भाषेचें ऐक्य हें इतर ऐक्यांचेंहि साधन आहे. अर्थात् मराठीच्या शुद्ध स्वरूपाची कल्पना सर्वत्र एक असावी हें इष्ट असून त्याचा हा प्रयत्न बहुसंमत होईल अशी आशा आहे.

---

# मुंबई सरकारचें येत्या सालचें अंदाजपत्रक

( लेखकः- ना. गो. चापेकर )

सरकारास जमाखर्चाचें अंदाजपत्रक तयार करणें जसें सुव्यवस्थित राज्यपद्धतीच्या दृष्टीनें आवश्यक तसें कुटुंबाचेंहि बजेट करणें जरूर आहे. पण आमच्या दुर्दैवानें ही दुसरी गोष्ट कोणाच्याच मनांत अद्यापि येत नाहीं. यामुळें कुटुंबांची जबरदस्त हानि होत आहे. बजेट म्हटलें म्हणजे सरकार व पैसा यांच्यांशीं त्याला आपण निगडित करतों. पण प्रत्येक बाबीचें बजेट करतां येईल व करतातहि. त्या-क्रियेला आपण निराळे शब्द वापरतों इतकेंच. वेळेचें अंदाजपत्रक करणें म्हणजे कार्यक्रम ठरविणें. मला इतकी फुरसत आहे, आणि तिचा खर्च (उपयोग) मी अमुक कामीं करीन असें आपण ठरविलें म्हणजे तें काम व्यवस्थित होतें. वेळेच्या अगर काळाच्या अंदाजपत्रकाप्रमाणें आयुष्याचें सुद्धां अंदाजपत्रक करून तदनुसार वागणें आवश्यक व हितावह आहे. माझ्याजवळ इतकी आयुर्दायरूपी व शरीरस्वास्थ्य-रूपी संपत्ति आहे तिचा मी अमूक रीतीनें व्यय करीन असें प्रत्येकाला ठरवितां येईल. हीं सर्व अंदाज-पत्रेंकच होत. पण येथें आपल्याला सरकारी अंदाजपत्रकाचाच विचार करणें आहे.

सरकार आपलें अंदाजपत्रक दरसाल तयार करतें. या पत्रकांत पुढच्या सालचा जमाखर्च अगो-दर मांडलेला असतो. अर्थात् हा ठोकळ असतो. जमाखर्चाची आवश्यकता कां उत्पन्न होते तें आपण पाहिलें पाहिजे. मनुष्यास खर्च करणें भाग पडतें. खाण्यापिण्याशिवाय तो जगणार नाहीं व वस्त्र–प्रावरणावांचून टिकणार नाहीं. ह्या कामीं अवश्य लागणारा खर्च भागविण्याकरतां त्याला पैसा मिळवणें जरूर आहे. जी गोष्ट मनुष्याची तीच सरकारची. खर्च करण्याकरतां सरकारसंस्था निर्माण झाली आहे. म्हणून खर्च करण्याकरितां व खर्च करण्यापुरतेच पैसे सरकारजवळ आले पाहिजेत हें उघड आहे. तात्पर्य, खर्च आहे म्हणून जमा आणि जमा आहे म्हणून खर्च करावयाचा असें नव्हे. पण ही गोष्ट मोठमोठे मुत्सद्दीहि विसरतात. अगोदर जमा आणि मग खर्च ही जी सध्यां चालू असलेली पद्धति ती याच विस्मृतीचें निदर्शक आहे. खर्चांतहि दोन प्रकार आहेत. आवश्यक खर्चानें मनुष्य फक्त जिवंत राहील. पण नुसतें जगणें ही कांहीं इतिकर्तव्यता नाहीं. आपण जगावें आणि आपला अभ्युदय व्हावा ही आपली इच्छा असते. म्हणून आवश्यक व आभ्युदयिक असे दोन प्रकारचे खर्च असतात. आवश्यक खर्च किती केला पाहिजे तें एकदा ठरवून तितका तो केल्यावांचून व्यक्तीला काय किंवा सरकारला काय गत्यंतरच नाहीं. असा खर्च निराळा दाखविण्याची वहिवाट पडली पाहिजे. आभ्युदयिक खर्चामध्यें मात्र तारतम्य असतें. समाजाचा जसा अभ्युदय होत जाईल त्य मानानें त्याचा आवश्यक खर्चसुद्धां वाढता होत जातो.

खर्चाच्या प्रमाणांत कमाई केली पाहिजे हा सिद्धांत खरा असला तरी कमाईला मर्यादा आहेच. लोकांचें उत्पन्न असेल त्याच मानानें सरकारला वसूल करतां येईल. कातकरी, ठाकूर, वारली इत्यादि जंगली लोकांचा—कीं ज्यांना धड घर नाहीं, दार नाहीं, शेत नाहीं, जमीन नाहीं, जे अर्धपोटी राहतात-अशांचा राजा आपण एखाद्यास बनविला तर त्याला तें राज्यपद दुस्सह होईल यांत संशय नाहीं. लोकांना राजाच्या स्वाधीन करतांना त्याला जर आपण जमीन दिली नाहीं तर कोणीहि राज्यपद स्वीकारणार नाहीं. म्हणून कोणत्याहि राज्यपद्धतींत प्रजेचें उत्पन्न व प्रजेची उत्पादक शक्ति यांचा नक्की अंदाज राज्यकर्त्यांनीं करून ठेवला पाहिजे. असें न करतां नुसत्या मनःकल्पित जमाखर्चाचा अंदाज करणें

अनुक्रमणिका

मूर्खपणाचें आहे. पण प्रजेच्या उत्पन्नाचा अंदाज हल्लींचे सुधारलेले राज्यकर्तेहि करीत नाहींत. राज्याचें अंदाजपत्रक तयार करणाराजवळ माणशीं उत्पन्नाचा आंकडा तयार असावयास पाहिजे.

सरकारी अंदाजाच्या अभावीं खासगी रीतीनें केलेला अंदाजच आपण घेऊं व तो घेतला असतां असें दिसतें कीं हिंदुस्थानांतील लोकांचें उत्पन्न माणशीं ६० रुपयांवर पडत नाहीं. नुसत्या जगण्याकरतां १०० रु. तरी माणशीं लागतात. अर्थात् हिंदुस्थानांतील लोक अर्धपोटी असतात. अशा अर्धपोट्यांचें राज्य कोणता सात्विक मनुष्य पतकरील? पण राज्य धडाडीनें चाललें आहे खरें. या ६० रुपयांतून सरकार किती घेतें तें पहा. हिंदुस्थान सरकार ४॥ रुपये घेतें. यंदाचें हिं. सरकारचें अंदाजपत्रक प्रसिद्ध झालें आहे. त्यांत १३२ कोट रुपये वसुलाचा अंदाज केला आहे. ब्रिटिश हिंदुस्थानची लोकसंख्या ३२ कोटींहून अधिक नाहीं. या हिशेबानें आपण प्रत्येकीं ४॥ रुपये हिं० सरकारास देतों असें होतें. आतां चालू सालचें मुंबई सरकारचें अंदाजपत्रक पहा. तें १५ कोट रुपये वसुलाचें आहे. ब्रि. मुंबई इलाख्याची लोकसंख्या सुमारें दोन कोट आहे. तेव्हां आपणां प्रत्येकापासून मुं. सरकार ७॥ रु. घेतें असें उघड होतें. ७॥ आणि ४॥ मिळून १२ रु. आपणांस वर्षाचा कर द्यावा लागतो. याशिवाय लोकलबोर्ड वगैरे स्थानिक संस्थांना ३ रु. जातात. एकूण १५ रु. ६० रु. उत्पन्नांतून प्रत्येक माणसास कर म्हणून देणें भाग पडतें. म्हणजे रुपयांतून चार आणे सरकार व तत्सम संस्था वसूल करतात. हा कर जाचक आहे यांत संशय नाहीं. सरकारला मायबाप म्हणण्याची चाल आहे पण ती चूक आहे. सरकार लोकांना पोशीत नाहीं. लोक सरकारला पोसतात. आपण आपल्या गव्हर्नरला जेवून खाऊन दरमहा १०००० रु. पगार देतों. गव्हर्नरच्या खाण्याचा खर्च सालीना २७००० असून गव्हर्नरच्या तैनातींतील लोकांनिमित्त होणारा खर्च ६४७००० रु. आहे. म्हणजे गव्हर्नर साहेबांच्या निमित्तानें आपणांस वर्षास ७९४००० रु. खर्च करावे लागतात. याशिवाय गव्हर्नरच्या बंगल्यांची दुरुस्ती येत्या सालीं ४१५००० रु. ची होणार. एकूण १२०९००० रु. ची तोशीस आपणांस गव्हर्नरसाहेबांच्या निमित्तानें लागणार.

सरकारला पैसे कां लागतात? लोकांच्या जीविताचें व मालमत्तेचें संरक्षण करणें, लोकांच्या सुखसोयीचीं साधनें निर्माण करणें व प्रजेचा उत्कर्ष जेणेंकरून होईल असे उपाय योजणें या गोष्टी करणें सरकारचें कर्तव्य आहे. परशत्रूपासून प्रजेचें संरक्षण करण्याची जबाबदारी प्रांतिक सरकारावर नसून हिं. सरकारवर आहे. सरकारला आपलें कर्तव्य बजावतां यावें म्हणून खर्च करावा लागतो. उ. लोकांच्या जीविताचें व मालमत्तेचें रक्षण करण्याकरतां सरकारला न्याय व पोलीस खातीं निर्माण करावीं लागतात. यामध्यें तुरुंगांचा अंतर्भाव होतोच. लोकांच्या सुखसोयीकरतां सडका, कालवे बांधणें, दवाखाने स्थापणें वगैरे कामें सरकारला हातीं घ्यावीं लागतात. यांत आरोग्यखात्याचा समावेश होतो. प्रजेच्या अभ्युदयाकरतां शिक्षणसंस्था काढाव्या लागतात, जंगलें राखावीं लागतात. हीं कृत्यें करण्यास सरकारला नोकर ठेवून पैसा खर्च करावा लागतो. आभ्युदयिक खातीं अर्धवट व्यापारी खातीं असतात. म्हणजे त्यांवर केलेला खर्च बराचसा भरून येतो. उ. पोष्ट, तारायंत्र, जंगल हीं खातीं घ्या. शिक्षणांतसुद्धां औद्योगिक शिक्षण हें व्यापारी खातें बनविण्यासारखें असतें. पण न्याय, पोलीस आणि शिक्षण हीं खर्चाचींच खातीं होत. तसेंच एकंदर राज्यकारभार चालविण्याकरतां गव्हर्नरापासून तलाट्यापर्यंत नोकर ठेवावे लागतात. ही बाबहि सर्वस्वीं खर्चाचीच आहे. राज्यकारभारावर २,२३,३३००० रु. खर्च पडतो, अर्थात् दरमाणसामागें २। रुपये सरकारास या खात्याप्रीत्यर्थ द्यावे लागतात. पोलीस, दिवाणी व फौजदारी कोर्टें, तुरुंग मिळून २,६९,७७००० रु. खर्चीं पडतात. शेतकीसुद्धां एकंदर शिक्षणासाठीं २,३८,७६००० रु. खर्च होतात. दवाखाने, आरोग्य, सडका वगैरेकरतां २,०५,२१००० रु. खर्च व्हावयाचे आहेत. जंगलखातें हें सरकारच्या फायद्याचेंच आहे. खर्चवेंच जाऊन या खात्यापासून २८,८५००० रु. नफा सरकारास रहातो. अर्धा कोट रुपये कालव्याप्रीत्यर्थ चालू सालीं खर्च होणार आहेत. सारांश हा व इतर

किरकोळ खर्च मिळून सुमारें ११ कोटि रुपये प्रजेकरतां खर्च करावे लागतात.

ही रक्कम सरकार कशी मिळविते ? जमा व खर्च या संबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं राखीव खातीं सोडून बाकीच्या खर्चासाठीं सरकार कायदेमंडळावर अवलंबून असतें. मंडळाची खर्चाला मंजुरी मिळाली पाहिजे. पण वसुलाच्या बाबतींत सरकार इतकें परतंत्र नाहीं. कायदे करून घेतल्यामुळें सरकारचा वसूल आपोआप होतो. शेतसारा, स्टँप, नोंदणी, अबकारी ह्या सरकारी उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत. एकंदर खर्चाचा तृतीयांश नुसत्या शेतसाऱ्यापासून सरकार मिळवूं शकतें. कारण ५,३८,००,०००रु. जमीनमहसुलाचें उत्पन्न आहे. त्याच्या खालोखाल अबकारीचें उत्पन्न ३,९?,१८००० रु. आहे. जमिनीचा सारा भरला नाहीं तर सरकारास जमीन खालसा करण्याचा अधिकार कायद्यानें दिला आहे. तेव्हां सारा वसूल होण्यास अडचण पडत नाहीं. स्टँपाचें उत्पन्न १,७०,१००७० रु. आहे. लोकांचें व्यवहार चालणारच. पण अमूक व्यवहार तुम्हीं केला तर अमूक स्टँपावर तो केलाच पाहिजे असा कायदा असल्यानें सरकारवसुली बिनबोभाट होते. जंगल व कालवे यांपासून सरकारला फायदा पुष्कळ होतोच. याप्रमाणें सरकारनें खर्चाची तरतूद करून ठेविली आहे. का. मंडळानें खर्च नामंजूर केल्यास सरकारच्या हातांत पैसा शिल्लक राहील इतकेंच. पण सरकारकडे जाणारा पैशाचा ओघ बंद होणार नाहीं. अधिक पैसे मिळण्याकरतां नवीन बिलें सरकारनें पुढें आणली तर ती का. मंडळास वाटल्यास नामंजूर करून पैशाचे नवीन झरे पाडण्याचें बंद करतां येईल.

यंदाचें बजेट ऑफिसांतील एखाद्या बुद्धिहीन कारकुनानें करावें तसें आहे. त्यांत अक्कल खर्च केलेली दिसत नाहीं; देशाभिमान नाहीं; लोकांविषयीं कळकळ भासत नाहीं. लोकांच्या सुखसोयीचीं साधनें वाढतील, व्यापार धंदा भरभराटेल, लोकांना सुखानें खावयाला मिळेल हा परिणाम ज्या अंदाजपत्रकानें होईल तें अंदाजपत्रक उत्तम. चालू सालीं आभ्युदयिक खात्यांची पिछेहाटच करण्यांत आली आहे. मग सरकार करतें काय ? अर्धपोटी रहाणाऱ्या लोकांकडून पंधरा कोट रुपये घेऊन ते आपल्या नोकरांना देतें. खरोखर पगाराचा प्रश्न अतिशय महत्त्वाचा आहे. आमच्याकडे सरकार आपल्या नोकरांना फाजील पगार देतें. नोकरी करणाराला सुखानें रहातां यावें, इतकें पगाराचें प्रमाण असावें. पण सध्यां पहावें तो नोकरांच्या दोन पिढ्यांना घरीं स्वस्थ बसून चैनीनें रहातां येईल इतका पगार देण्यांत येतो. कोणत्याहि ए. कौन्सिलरची किंवा दिवाणांची शिल्लक तपासा आणि काय अनुमान निघतें तें पहा. दोन हजार रुपयांपेक्षां अधिक पगार कोणालाहि राज्यांत मिळतां कामा नये. पण ह्या कल्पना वळावण्यास लोकांना वस्तुस्थितीचें ज्ञान झालें पाहिजे. महागाईमुळें पगार पुष्कळ द्यावा लागतो हें कांहीं खोटें नाहीं. इतर लोकांपेक्षां सरकारला तर ही महागाई फारच नडते. सरकार उत्पादक धंदे करीत नाहीं. कारखानदार सरकाराप्रमाणें मोठा नोकरवर्ग बाळगतो. पण कारखानदारांना महागाईचा फायदा मिळतो. तसा सरकारला मिळण्याचें साधन नाहीं. एका हातानें कारखानदारास पुष्कळ पैसा द्यावा लागला तर दुसऱ्या हातांत त्याला आपल्या मालाचा पुष्कळ पैसा येतो. म्हणून सरकारनें नोकरांची संख्या व पगार आटोक्यांत ठेवला पाहिजे. सरकार हें समजत नाहीं असें नाहीं. पण मोठ्या पगाराचे नोकर वाढविण्याकडे सरकारचा ओढा अधिक. याचें प्रत्यंतर याच बजेटांत आपणांस पहावयास मिळतें. लीगल डिपार्टमेंटमध्यें आजपर्यंत सीनिअर सुपरिंटेंडेंट म्हणून जो मनुष्य काम करीत होता त्याचा हुद्दा आतां पर्सनल असिस्टंट म्हणून सरकारानें केला व त्याबरोबर त्याला १०० रु. महिना पगारहि वाढविला. माणूस तोच व कामहि तेंच, पण पगार मात्र अधिक. वरिष्ठ अधिकाऱ्याची जबाबदारी हलकी करण्याकरतां ही पगारवाढ झाली म्हणावयाची. अलीकडे प्रत्येक अधिकाऱ्याला पर्सनल असिस्टंट लागतो. त्याशिवाय त्याला कामच करतां येत नाहीं. हें पर्सनल असिस्टंटचें बंड मोडेल तर बरें. असो. पण या अनावश्यक पगारवाढीच्या उलट सरकारची हलक्या नोकरांसंबंधानें दिसून येणारी अनुदारता पहा. अंधेरी व वांद्रें येथें महागाई फार म्हणून सरकारनें १९ शिपायांना प्रत्येकीं

३ रु. महिना अलावन्स म्हणून देण्याचें ठरविलें; पण त्याबरोबरच २१ रु. पगाराचा एक शिपाई कमी करण्यांत आला. पगारी नोकरांची संख्या वाढविणें प्रजेच्या दृष्टीनें फारच अनिष्ट आहे. पगारी नोकर सरकारचें हित बघतो. प्रजेचें हित त्याला दिसतच नाहीं. बिनसरकारी योग्य माणसें नेमून त्यांच्याकडून काम करून घेणें अशक्य नाहीं. प्रत्येक गांवीं ग्राम-पंचायती नेमून त्यांच्यावर बरेंच काम सोपवतां येईल. पण इकडे आमच्या सरकारचें लक्षच नाहीं. ग्रामपंचायती ठिकठिकाणीं नेमण्याविषयीं आमच्या लोकांनींहि सारखी चळवळ केली पाहिजे. पगारी नोकर कमी करण्याचा हाच एक उपाय आहे.

लोकांच्या उत्पादनशक्तीला मर्यादा असल्यामुळें सरकारचा करवसुलीचा हक्कहि मर्यादित होणें स्वाभाविक आहे. म्हणून प्रजेचें उत्पन्न, त्या मानानें खर्च व त्याच प्रमाणांत जमा असा क्रम बसतो. पण जमाखर्चाची आवश्यकता कां या प्रश्नाचें उत्तर आपणांस अद्यापि द्यावयाचें आहे. जवळ असेल तें खर्च करणें किंवा खर्च पडेल तितकें मिळविणें एवढें करून मनुष्याचेंहि भागत नाहीं. आजार, वार्धक्य, आकस्मिक पंगुत्व यांमुळें अर्जनसामर्थ्य एकदम बंद होतें. अशा वेळीं माणसानें शिल्लक टाकलेला पैकाच त्याच्या कामीं येतो. खर्च हा मरेपर्यंत चालतोच: इतकेंच नव्हे तर मेल्यानंतरहि कांहीं काल खर्च करावा लागतो. पण अर्जनसामर्थ्य अखेरपर्यंत टिकत नाहीं. बालपणीं तें नसतें तसेंच वृद्धपणीं तें रहात नाहीं. बालपणीं आपणांस आपला पिता पोसतो तर आपल्या मुलांना त्यांच्या लहानपणीं आपणांस पोसावें लागतेंच. तात्पर्य, वयाच्या मध्यावस्थेंत आपण जें कांहीं मिळवूं त्यांतूनच वृद्धावस्थेकरतां राखून ठेवणें जरूर आहे. म्हणून जमाखर्च अथवा अंदाजपत्रक करणें भाग पडतें. त्याशिवाय आपली कमाई किती, पैकीं शिल्लक किती टाकली पाहिजे आणि खर्चाकरतां किती ठेवलें पाहिजे हें नीट समजणार नाहीं. जो गोष्ट मनुष्याची तीच सरकारची. दुष्काळ, अतिवृष्टि, रोगांच्या सांथी इत्यादि आपत्तींमुळें सरकारला वसूल मिळत नाहीं. उलट प्रजाच संकटांत पडल्यामुळें सरकारला प्रजेकरतां पाण्याप्रमाणें पैसा ओतावा लागतो. जवळ शिल्लक नसेल तर आपत्तीला तोंड देणें सरकारास अशक्य होईल. म्हणून सरकारानें दर वर्षी ठराविक प्रमाणांत शिल्लक ठेवीत गेलें पाहिजे. कायद्यानें हें प्रमाण ठरविणें चांगलें. एकंदरींत शिलकेसंबंधानें कायदा असणें जरूर आहे. अशी कांहीं व्यवस्था आपल्या सरकारानें केली आहे ही फार शहाणपणाची गोष्ट आहे. अशी व्यवस्था नसती तर गुदस्तां जलप्रलयानें अनाथ झालेल्या गुजराथेंतील लोकांस मदत करणें अशक्य झालें असतें. कायदेमंडळानें गुजराथवर आपत्ति कोसळतांच ८९,५८,००० रु. या आपत्तिनिवारणार्थ मंजूर केले. सन १९२६च्या एप्रिल आरंभीं १, ९५, ३२,००० रु. दुष्काळफंडांत शिल्लक होते. या रकमेंतून वरील ८९, ५८-००० रु. सरकारास आयत्या वेळीं पुढें करतां आले. सरकारनें यांपैकीं फक्त ७३,००,००० रु. जेमतेम खर्च केले ही गोष्ट निराळी. ही एकच गोष्ट जमाखर्चाच्या पद्धतींत शहाणपणाची दिसते. बाकी १५ कोटी रुपये सरकार प्रजेपासून घेतें त्याचा योग्य मोबदला प्रजेला मिळत नाहीं असेंच म्हणावें लागतें. दुष्काळफंडांतून बरीचशीं कामें होतात. दुष्काळफंड नसता तर प्रजेनें दिलेला कर सरकारी नोकरांनींच खाऊन टाकला असता. मराठेशाहींत नोकरांकडून सर्व कामें करून घेण्याची वहिवाट नव्हती. म्हणून चालू राज्याला नोकरराज्य म्हणतात तें योग्यच आहे.

सरकारच्या कांहीं उत्पन्नाच्या बाबी लोकांनीं विचार करण्यासारख्या आहेत. ऑफिशिअल असायनी नादारांतर्फे त्यांच्या सावकारांना हिस्सेरशीनें कांहीं देण्याचें ठरवितो तेव्हां कित्येक रकमा सावकारांनीं न नेल्यामुळें अखेरीस त्या सरकारजमा होतात. गेल्यासालीं या द्वारानें सरकारास ८,१२,००० रु. मिळाले. पोष्टांतल्या, कोर्टांतल्या वगैरे रकमा यांत मिळविल्या तर ही रक्कम कितीतरी फुगेल. कोर्टांत पक्षकारांना देण्याकरतां जमा झालेली रक्कम सरकारी खाजिन्यांत असते. (या रकमांचा फायदा हिंदुस्थान-सरकारास मिळतो.) तीवरील व्याज एकत्र केलें तर एक प्रचंड रक्कम होईल. अशा रकमा शिक्षणाच्या कामींच खर्चाव्या असा निर्बंध घालतां येण्यासारखा आहे. राज्यकारभारानंतर सर्वांत अधिक खर्च

सरकार शिक्षणखात्यावर करतें. यंदाच्या अंदाजपत्रकांत दोन कोटी रुपये शिक्षणदानार्थ खर्च करण्याचा संकल्प सुटला आहे. याचा अर्थ शिक्षणाकरतां माणशीं एक रुपया खर्च केला जातो. आपल्याकडे १ रुपया तर ग्रेटब्रिटनमध्यें १ पौंड खर्च माणशीं शिक्षणानिमित्त खर्च करण्यांत येतो. १ पौंड म्हणजे १३ रुपयांहून अधिक हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. मुंबई सरकारचें बजेट १५ कोट रुपयांचेंच आहे. पण इंग्लंडचें बजेट ११०० कोट रुपयांचें आहे. लोकसंख्येच्या मानानें पाहतां मुंबई इलाख्याच्या दुप्पट ग्रेट ब्रिटन आहे. तेव्हां आमच्या इकडील मानानें तेथील अंदाजपत्रक ३० कोट रुपयांचें असावयास पाहिजे. तिसाच्या ऐवजीं तीनशें नाहीं अकराशें कोट रुपयांचें आहे. यावरून इंग्लंडच्या श्रीमंतीची कल्पना करतां येईल. आणि त्याचप्रमाणें आह्मी किती दरिद्री आहों हेंहि समजेल. इंग्लंडला स्वतःला श्रीमंत करून घेतां आलें, मग हिंदुस्तानला तसें कां करतां येऊं नये? १० रुपयांना पौंड या दरानें सर्व हिंदुस्थानचें बजेट १३ कोटि पौंड होतें. तेरा कोट कोठें व ऐशीं कोटि कोठें !

असो. हिंदुस्थानच्या दरिद्री लोकांना झेपेल अशी राज्यपद्धति शोधून काढण्याचें जोंपर्यंत कोणाच्या मनांत येत नाहीं तोंपर्यंत असल्याच मासल्याचीं अंदाजपत्रकें निर्माण व्हावयाचीं. शेवटीं असा इशारा द्यावासा वाटतो कीं ठिकठिकाणीं किंबहुना प्रत्येक ठिकाणीं सरकारी बजेट लोकांस सालोसाल समजावून देण्याची व्यवस्था कांग्रेस कमिट्यांनीं करण्याचें मनावर घ्यावें.

---

अनुक्रमणिका

# जुने मराठी गद्याचे नमुने

कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांच्या अनेक आवडत्या विषयांपैकीं, व्याकरणशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, व मराठी भाषेची उत्पत्ति आणि विकास हे आवडीचे विषय होते. अलीकडे कित्येक लोकांच्या तोंडून असा प्रवाद ऐकण्यांत असे कीं, इंग्रजी राज्याची महाराष्ट्रांत स्थापना होण्यापूर्वीं मराठी भाषेंत विशेषेंकरून पद्यस्वरूपांतच ग्रंथरचना होत असे. गद्यस्वरूपांत फारच थोडे ग्रंथ रचण्यांत येत. हा प्रवाद कै. राजवाड्यांना संमत नव्हता. त्यांच्या निधनापूर्वी त्यांच्या संग्रहांतील मराठी व संस्कृत हस्तलिखित ग्रंथांची यादी त्यांनीं तयार करविली. ही यादी ब्राह्मणपत्रिकेंत लवकरच प्रसिद्ध होईल. तीवरून त्यांचा हस्तलिखित संग्रह किती अमूल्य आहे, हें सर्वांस कळून येणार आहे. ही यादी करीत असतांना जुन्या मराठी गद्याचे नमुने म्हणून कांहीं ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध करण्याकरितां निराळे काढून ठेविले होते. त्यांपैकीं कांहीं ग्रंथांच्या मुद्रणनकला त्यांनीं दुसऱ्याकडून लिहवून ठेविल्या होत्या. मराठी भाषेच्या विकासाच्या इतिहासाच्या दृष्टीनें हे गद्यग्रंथाचे नमुने छापणें अत्यंत अवश्य आहे, हें कोणासहि पटण्यासारखें आहे.

साहित्यपत्रिकेच्या संपादकांशीं वरील प्रकारचे ग्रंथ छापण्याच्या बाबतींत आमचा पत्रव्यवहार होऊन जुने मराठी गद्यग्रंथांचे नमुने छापण्याचें अभिवचन त्यांनीं आनंदानें दिलें आहे. अभिवचनानुसार या अंकांत " मराठी गीतापदबोधिनी " या नांवाचा शके १७१९ पिंगलनाम संवत्सरांत रचलेला ग्रंथ प्रसिद्ध करण्यास घेतला आहे; व यापुढें सवडीनुसार याच प्रकारचे गद्यग्रंथांचे नमुने वेळोवेळीं छापण्यांत येतील.

**भास्कर वामन भट**
चिटणीस, राजवाडे–इतिहास–
संशोधनमंडळ धुळें.

अर्जुन उवाच ॥ एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ॥ ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥१॥ टी ॥ एवं या प्रकारें । सततं । निरंतर । युक्ताः । युक्त होत्साते । ये भक्ताः । जे भक्त । त्वां । सर्वज्ञ सगुण ऐशा तुतें । यच्चापि । इतर कोणी जे । अक्षरं । अवेच ऐसें जे । अव्यक्तं । इंद्रियांसि दृश्य नव्हे ऐसें ब्रह्म जे त्यातें । पर्युपासते । तेषां । त्या दोघांमध्यें । एके योगवित्तमाः । कोण योग जाणते श्रेष्ठ ॥१॥ श्लो ॥ श्री भगवानुवाच । मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ॥ श्रध्दया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥२॥ टी ॥ ये । जे । मयि । माझ्याठाईं । मनः । मनाते । आवेश्य । घालून । नित्ययुक्ताः । अखंड जडलें ऐसें । परया श्रध्दया उपेताः । उत्कृष्ट आस्तिक्य बुध्दीने भजत होत्सात । मां मातें । उपासते । भजताहेत । ते । भक्त जे ते । मे । मज । युक्ततमाः । अत्यंत योग्य । मताः । मानलें ॥२॥ श्लो ॥ ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ॥ सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवं ॥३॥ टी ॥ ये तु । जे तरि । अक्षरं । अवेच । सर्वत्रगं ॥ सर्वव्यापि ऐसें । अचिंत्यं च । कल्पने योग्य नव्हे ऐसें । कूटस्थं । माया तत्कार्य अधिष्ठान ऐसें । अचलं । निश्चळ ऐसें । ध्रुवं । नित्य ऐसें । पर्युपासते । उपासिताहेत ॥३॥ श्लो ॥ संनियम्येंद्रिय-

ग्रामं सर्वत्र समबुध्धयः ॥ ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥४॥ टी ॥ इंद्रियग्रामं । इंद्रियसमुद्रायातें । संनियम्य । बरवा नियम करुंन । सर्वत्र । सर्वांविषयिं । समबुध्धयः । समानबुध्धि ऐसे सर्वभूतहिते रताः । सकळभूतांच्या हितिं रत ऐसा ॥ ते । ज्ञानी जे ते । मामेव । मातेंच । प्रप्नुवन्ति । पावताहेत ॥४॥ श्लो॥ क्लेशोधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसां ॥ अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥५॥ अव्यक्तासक्तचेतसां ॥ निर्गुणि आसक्त चित्त ज्याचें ते ऐसे । तेषां त्यांस । क्लेश । आयास जो तो । अधिकतरः । बहुताहुंन बहुत । हि । निश्चयेंसि । अव्यक्ता । प्रघट नव्हे ऐसे । गति । चाल जी ती । देहधारी जे तीहिंकरुंन । क्लेश होय जैसें । अवाप्यते ॥ पाविजेते ॥५॥ श्लो ॥ ये तु ॥ जें किं । मयि । माझ्या ठाइं । सर्वाणि कर्माणि । सर्व कर्मे जिं ति । सन्यस्य । समर्पून । मत्पराः । मत्पर ऐसें । अनन्येनैव । मज वेगळा दुसरा नाहिं ऐसे । योगेन । योग जो तेणें । मां मातें । ध्यायंतः । ध्यान करित होत्साते । उपासते । भजताहेत ॥६॥ श्लो॥ तेषामहं समुध्धर्ता मृत्युसंसारसागरात् । भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसां ॥७॥ टी॥ हे पार्था॥ अगा अर्जुना ॥ मय्यावेशितचेतसां । माझ्या रूपीं घातलें आहे चित्त ज्याणी ते ऐसे । तेषां । त्यास । मृत्युसंसारसागरात् । मृत्युलक्षण संसारसागरापासून । अहं । मि जो तो । समुध्धर्ता । उध्धार करणार । न चिरात् । लवकरच । भवामि । होतों ॥७॥ श्लो ॥ मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशयत् । निवसिष्यासि मय्येव अत उर्ध्वं न संशयः ॥८॥टी॥मय्येव । मज विस्वरूपाचे ठाईं । मनः। मन जे तें । आधत्स्व ठिवीं । मथी । माझ्या ठाईं । बुद्धिं । बुद्धि जे तीतें । निवेशयः । एकाग्र कर । अत उर्ध्वं । याउपरांत । मय्येव । माझ्या रूपीच । निवशिष्यासि । राहाशील । न संशयः । संशय नाहि ॥८॥श्लो॥ अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि म यि स्थिरं ॥ अभ्यासयोगेन ततो मामिछाप्तुं धनंजय ॥९॥टी॥ हे धनंजय । अगा धनंजया॥ अथ यानंतर । मयि । माझ्या ठाइं । चित्तं । चित्त जे तें । स्थिरं । स्थिर ऐसे । समाधातुं । ठेवाया कारणें । न शक्नोषि । सकत नाहिस । ततः । तरि । अभ्यासयोगेन । अभ्यासयोग जो तेणेंकरुंन । मां । मांते । आप्तुं । पावाया कारणें । इछ । यत्न कर । ९ ॥श्लो ॥ अभ्यासेप्यसमर्थोसि मत्कर्मपरमो भव । मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिध्धिमवाप्स्यसि ॥१०॥ टी ॥ अभ्यासेपि । अभ्यासाच्याठाईंहि । असमर्थोसि । समर्थ नव्हेस तरी । मत्कर्मपरः । व्रादिककर्माच्याठाइं आदरवंत ऐसा । भव । होइं । मदर्थमपि । मजकारणेंहि । कर्माणि । कर्मे जिं त्यांते । कुर्वंन् । करित होत्साता । सिध्धि । चित्तशुध्धिद्वारा ज्ञानातें । अवप्स्यसि । पावशील ॥१०॥ श्लो ॥ अथैतदप्यशक्तोसि कर्तुं मद्योगमाश्रितः ॥ सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥११॥ टी ॥ अथ । या नंतर । एतत् । हें पूर्वोक्त कर्म जे तें । कर्तुं । कराया कारणें । अशक्तोसि । अशक्त आहेस ॥ ततः । त्यानंतर । मद्योगमपि । मदर्थकर्म करणें ऐसा योग जो त्यातें । आश्रितः । आश्रयिला होत्साता । यतात्मवान् । जितचित्त ऐसा । सर्वकर्मफलत्यागं । सर्वकर्मफळाचा त्याग जो तो । कुरु । करिं ॥११॥श्लो॥ श्रेयो हि ज्ञानमभ्यासा ज्ञानाध्यानं विशिष्यते । ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाछांतिरनंतरं ॥१२॥ टी ॥ अभ्यासात् । अविवेकें कर्मफळत्यागापेक्षां । ज्ञानं । जाणोनि करणें जें । श्रेयः ॥ पुण्यप्रधान होय । हि ।

निश्चयें । ज्ञानात् । जाणिवेपेक्षां । ध्यानं । ध्यान जें तें । विशिष्यते । अधिक होतें । ध्यानात् । ध्यानाहुन । कर्मफलत्यागः । कर्मफलत्याग जोतो अधिक । त्यागात् । त्यागाहुंन । अनंतरं । सवेंच । शांतिः । शांति जे ते अधिक ॥१२॥ श्लो ॥ अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करूण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥१३॥टी॥ सर्वभूतानां । प्राणि जे त्यांचा । अद्वेष्टा । द्वेषशून्य ऐसा । मैत्रः । मित्र ऐसा । करूण एव च । दयावत एसा । निर्ममः । ममताशून्य ऐसा । निरहंकरः । अहंकाररहित ऐसा । समदुःखसुखः । सुखदुःख समान ज्यास ऐसा । क्षमी । परापराधि विकारशून्य ऐसा ॥१३॥ श्लो ॥ संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ॥ मय्यर्पितमनोबुद्धियो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४॥ टी ॥ सततं । निरंतर । संतुष्टः ॥ लाभालाभी समानवुध्यि ऐसा ॥ योगी । वशीकृताचित्त ऐसा । यतात्मा । निग्रहस्वभाव ज्याचा तो ऐसा । दृढनिश्चयः । भवविषय असत्य म्हणुन दृढनिश्चय ऐसा । मय्यर्पितमनोबुध्यिः । माझेठाइं मन वुध्यि अर्पिली ऐसा । यः । जो । मद्भक्तः । माझा भक्तः । सः । तो । मे प्रियः । मज अत्यत आवडता ॥१४॥ श्लो ॥ यस्मांनोद्विजते लोको लोकानां द्विजते जयः ॥ हर्षामर्षभयोद्वेगैमुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥ ॥टी॥ यस्मात् । ज्यापासून । लेकः । लोक जो तो । नेद्विजते । मोक्षाते पावत नाहिं । लोकात् । लोकापासून । यः । जो । नोद्विजते च । संतापाते पावत नाहिं । हर्षामर्षभयोद्वेगैः । प्रियलाभि हर्षपरोत्कर्षी असहनता । व्याघ्रादिदर्शने त्रास चित्तक्षोभे इंहिं करुन । मुक्तः । सुठला । यः । जो । स च मे प्रियः । तोचि मज अत्यत प्रिय होय ॥१६॥श्लो॥ अनेपक्ष शुचिर्दक्ष उदासिनो गतव्यथः॥ सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१७॥टी॥ भोगसामोग्री प्राप्त असता चाढ नाहिं ऐसा । शुचिः । सबाह्याभ्यंतरी शुचि ऐसा । दक्षः । अलस्यराहित एसा । उदासीनः । कोणाचा पक्षपाती नव्हे ऐसा । गतव्यथः । अधिशून्य ऐसा । सर्वारंभपरित्यागी । दृष्टादृष्टाचा उद्यम टाकणार ऐसा । मद्भक्तः । ऐसा जो माझाभक्त । स मे प्रियः । तो मज अत्यंत आवडता ॥१६॥ श्लो ॥ यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचीत न कांक्षति । शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥ टी ॥ यः । जो । न हृष्यति । इष्टप्राप्तीचा संतोष नाहि ऐसा । न द्वेष्टि । अनिष्टप्राप्तीचा द्वेष नाहि ऐसा । न शोचति । गेले वस्तूचा शोक नाहि ऐसा । न कांक्षति । अप्राप्तीची इछा नाहि ऐसा । शुभाशुभपरित्यागी । बरें वायीटाचा त्याग स्वभाव ऐसा । भक्तिमान् । भजनशील ऐसा । यः । जो । स मे प्रियः । तो मज प्रिय ॥१७॥श्लो॥ समःशत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ॥ शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥१८॥टी॥ अशौच मित्रे च । वैरी आणि मित्राचे ठाइं । समः । एकरूप ऐसा । मानापमानयोः । मानापमानाच्याठाइंहि । तथा । तैसाच । शीतोष्णसुखदुःखेषु । शीत उष्ण सुखदुःख आशा द्वंद्वाच्या ठाइं । समः । येकरूप । संगविवर्जितः ॥ कोठेंहि आसक्त नाहिं ऐसा ॥१८॥श्लो॥ तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ॥ अनिकतेस्छिमतिभक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥ टी ॥ तुल्यनिंदास्तुतिः । समान आहे निंदास्तुति ज्यांस ऐसा । मौनी । अपृछ परिभाषित नव्हे ऐसा । यनकेन चित् । शरीर स्थिति येणे जेणे होय । संतुष्टः । तेणे करून संतुष्ट । अनिकेत । नियत स्छान नाहिं ज्यास तो ऐसा । भक्तिमान् । भक्तिवंत । नरः । पुरुष जो तो । मे प्रियः । मज आवडता होय ॥१९॥

# भांडीरभाषाव्याकरण

संपादक, **वासुदेव गोपाळ परांजपे,** एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्. (पॅरिस)

## प्रास्ताविक

भाण्डीरभाषाव्याकरण हा ग्रंथ पॅरिस युनिव्हर्सिटींतील भारतीयभाषाकोविद प्रो. ब्लॉक यांनीं माझ्या निदर्शनास आणून दिला व त्यांनींच मला तंजावर येथील पोथी क्रमांक ९९९ व हिची स्वतःकरितां करविलेली देवनागरी नक्कल दिली. ह्या पोथीखेरीज तंजावर येथें आणखी एक पोथी आहे; पण तेथील ग्रंथभांडाराच्या नियमांप्रमाणें ती मला पडताळण्याकरितां मिळणें शक्य नव्हतें, पण इंडिया ऑफिस येथील हस्तलिखित क्रमांक व ४०३ आणून पाहतां ती तंजावर येथील दुसऱ्या पोथीची नक्कलच आहे असें दृष्टोत्पत्तीस आलें. ही नक्कल मूळाप्रमाणें तेलगू लिपींतच आहे: पण भाण्डारकरप्राच्यविद्यासंशोधनमंदिरांतील श्री. वेंकटरमण-शास्त्री यांच्या साहाय्यानें मी त्या प्रतींतील पाठभेद लिहून घेतले. या दोन प्रतींवरून तयार केलेलें मूळ थोडें सदोष असलें तरी त्या दोन्हीं प्रतींच्यापेक्षां अधिक शुद्ध आहे हें खास. पाठभेदांमध्यें निःसंशय जे अनुपयुक्त अपपाठ आहेत ते दिलेले नाहींत.

इंडिया ऑफिसमधील प्रतींत कांहीं भाग तांबड्या शाईनें लिहिला आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्या प्रतींत सूत्रपाठाप्रमाणें कांहीं भाग ग्रंथान्तीं दिला आहे. यावरून प्रस्तुत ग्रंथांतील कांहीं भाग सूत्ररूपाचा व राहिलेला भाष्यरूपाचा आहे हें आंध्रदेशीय अभ्यासकांना माहीत होतें असें दिसतें. पण सूत्रभाग कोणता व टीकाभाग कोणता ह्याचें नक्की ज्ञान नसल्यामुळें सूत्रग्रंथ व टीकाग्रंथ ह्यांची मिसळ झालेली आहे. मी ह्या दोन भागांचें पृथक्करण केलें आहे. मात्र जागा फार अडूं नये म्हणून सूत्रभाग जाड अक्षरांनीं छापून साध्या अक्षरांनीं त्याच ओळींत टीका घेतली आहे; पण ग्रंथान्तीं सूत्रभाग पुन्हा मूळांत अपुरेपणानें आलेला आहे त्या ठिकाणीं मात्र तो पूर्ण केलेला आहे.

भाण्डीरभाषा म्हणजे अनेक देशांतील व कदाचित् अनेक शतकें चालत आलेल्या गीतसंग्रहाची भाषा. हा अर्थ आरंभींच्या श्लोकांत दिला आहे. ही गीतें म्हणणारे व वादनकुशल असे लोक असत त्यांना भांडिक व भांडीर ह्या संज्ञा होत्या. अर्थात् त्यांच्यामुळेंहि भांडीरशब्द सिद्ध झाला असेल. भांडीरवृक्षाचा उल्लेख जुन्या वाङ्मयांत आहे. कांहींहि असो, प्रथम सांगितलेल्या लक्षणाप्रमाणें संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व देशीभाषा या सर्वांचाच प्रस्तुत ग्रंथांत संग्रह व्हावयास पाहिजे व अंशतः तसा संग्रह संक्षिप्त तऱ्हेनें येथें आहेच. पण अशा तऱ्हेच्या भाषासंकराला व्याकरणदृष्ट्या कांहींच महत्त्व नाहीं. दैवयोगानें असें झालेलें आहे कीं प्राकृत व अपभ्रंशाचा विचार फार त्रोटक रीतीनें करून सूत्रकार देशी भाषांकडे वळला आहे व जरी पुष्कळ देशांच्या भाषांचा तो निर्देश करितो तरी मुख्यत्वेंकरून एका भाषेचीच तो रूपें देत आहेसें दिसतें. त्या एका भाषेचें गीतभाषा म्हणून फार महत्त्व असेल. टीकाकार आन्ध्रदेशीय आहे. कारण तो आंध्रपर्याय सांगतो.

म्हणून जरी सूत्रकारासंबंधानें कांहीं माहिती नसली तरी टीकाकाराच्या वेळीं तरी ह्या भाषेला आंध्रदेशांत महत्त्व होतें हें निर्विवाद आहे. ही मुख्य भाषा म्हणजे जुनी मराठीच आहे हें पुढील ग्रंथावरून दिसेल व ज्ञानेश्वरकालीन मराठीशीं तुलना करण्याला ह्या ग्रंथांत विपुल भाषासामग्री मिळते; इतिहासदृष्ट्या व व्युत्पत्तिदृष्ट्याहि अभ्यासकांस या ग्रंथाची थोडीबहुत मदत होईल असें वाटतें. ग्रंथाच्या शेवटीं परिशिष्टवजा ही सर्व सामग्री संकलितरूपानें देण्याचा विचार आहे. ग्रंथाची मांडणी आधुनिक भाषाशास्त्राला अनुसरून असून वर्णप्रक्रिया (Phonology) व रूपप्रक्रिया (Morphology) हे त्याचे मुख्य विभाग आहेत व त्यांतील माहिती संक्षिप्त पण फार उपयुक्त आहे हें वाचकांस कळून येईलच.

वजीर व दुने(निआ)दार हे शब्द टीकेंत आले आहेत यामुळें टीकाकार महंमदीय राजवटीनंतरचा आहे हें सिद्ध होतें. उलट पक्षीं टीकाकार व सूत्रकार यांमध्यें बरेंच कालांतर आहे. कारण टीकेंत सूत्राचे पाठभेद सांगितलें आहेत; ह्यावरून कोणीतरी गंमतीखातर हें व्याकरण लिहिलें नसून देशी व्याकरणांची परंपरा होती व देशी भाषांवरहि, कांहीं अंशीं पाणिनीय परिभाषेनें, कांहीं अंशीं प्राकृत व्याकरणांच्या व्यावहारिक व त्रोटक पद्धतीनें, शार्दूल, श्रीवत्स वगैरे वैयाकरणांचे परिश्रम झाले होते, असें स्पष्ट होतें. आरंभीं श्लोकांतील व पुढेंहि एका उल्लेखावरून सूत्रें शार्दूलाच्या नांवावर मोडत असें दिसतें. शार्दूल हा संगीतावरील ग्रंथकार असून त्याच्या नांवाची व कोहलाच्या नांवाची बहुधा सांगड असते. अर्थात् शार्दूल हें एक नुसतें पुराणप्रसिद्ध नांव आहे, खुद्द ग्रंथकाराचें तें नांव असेल असें नाहीं. पण टीकाकार हा ग्रंथकाराहून भिन्न आहे याला दुसरें एक असें प्रमाण आहे कीं सूत्रकार ह्याला जुन्या मराठीची चांगली माहिती असावी, पण टीकाकार नियमांप्रमाणें रूपें सिद्ध करितो व तसें करीत असतांना अगदीं असंभाव्य रूपें सिद्ध करितो. हें नामरूपांच्या प्रकरणावरून दिसून येईल.

टीकाकाराचें स्वनाम किंवा वाङ्मयनाम वागीश्वर आहे व तो आपल्या टीकेला भाषामञ्जरी म्हणतो.

कीलहॉर्ननें ज्या रीतीचा अवलंब करून पातञ्जलमहाभाष्यापासून कात्यायनकृत वार्तिकांचें पृथक्करण केलें त्याच रीतीनें मीहि सूत्र व भाष्य यांचें पृथक्करण करीत आहे; म्हणजे जेथें ग्रंथांतील कांहीं भाग स्पष्टीकरणार्थ असून त्यांत शब्दांची व अर्थाची द्विरुक्ति होते तो टीकाग्रंथ, ज्याचें स्पष्टीकरण केलें आहे व जो संक्षिप्त आहे तो सूत्रग्रंथ, असें मीं कल्पिलें आहे.

ग्रंथ संस्कृतांत व व्याकरणपरिभाषेनें लिहिला असल्यामुळें केवळ मराठी वाचणारांसच नव्हे, तर संस्कृतज्ञांसहि भाषांतराचा उपयोग होईल अशा समजुतीनें भाषांतर देत आहे. ज्या ठिकाणीं मूळांत रूपेंच आहेत त्या ठिकाणीं भाषांतरांत त्यांची फारशी द्विरुक्ति केलेली नाहीं. सूत्रांचें भाषांतर ' ' या अवतरणचिन्हांनीं दाखविलें आहे.

## संकेतचिन्हें

पाठभेद लिहिण्याकरितां पुढील संकेत उपयोगांत आणिले आहेत.

अ = प्रो. ज़ुल् ब्लोक यांनीं करविलेली तं. ९९९ ब ची नक्कल हिचा पाठ.

इ = इंडिया ऑफिस क्र. व ४०३ (तंजावर ४४ ब ची) नक्कल हिचा पाठ.

सामान्यतः अचे पाठ बरे आहेत त्यामुळें बहुधा 'इ'चीं पाठांतरें दिलीं आहेत. यामुळें खालीं 'अ' किंवा 'इ' असें लिहिलें नसलें तर तो पाठ 'इ'चा समजावा. 'इ'चा पाठ ग्राह्य धरल्यास खालीं 'अ' हा स्पष्ट निर्देश केला आहे. दोन्हीं प्रतींचा पाठ सोडला असल्यास दोघींचीं पाठांतरें दिलीं आहेत. मजकूर गाळला असल्याचें ० असें चिन्ह घातलें आहे.

# भाण्डीरभाषाव्याकरणम्

श्रीः[1] । [2]सीतारामाभ्यां नमः[2] ॥

वागीश्वरं नमस्कृत्य व्यासशार्दूलनारदान् ।
वाणीं च कुर्वे[3] भाण्डीरभाषाव्याकरणं शुभम् ॥
भाण्डीरदेशे भाण्डीरवटशाखाप्रसारिते ।
वृन्दावनान्तरे कृष्णः पूर्णानन्दपरिप्लुतः[4] ॥
कालिङ्गगौडकाम्भोजावन्त्यसौराष्ट्रमागधैः ।
महाराष्ट्रे[5] च सम्भूतैः सरसैर्गोपिकाजनैः ॥
तैः सहस्रैः षोडशभिः परितः परिभूषितः ।
परिश्रममपाकर्तुं रासक्रीडां विधाय च ॥
भाण्डीरतरुमाश्रित्य त्रिभङ्गीस्थानकस्थितः ।
अधःकराभ्यां पञ्चेषुक्रियाचातुर्यलोलुपः ॥
चारयन्नू[6]र्ध्वपाणिभ्यां वेणुनादं मृदुत्वतः ।
ताभिस्तद्देशजान् रागानाकर्ण्य परया मुदा ॥
समीररूपान् रागांस्ताननिबद्धतया नृणाम् ।
प्रसिद्धीकर्तुमानन्दाद्भाण्डीरं बहुदेशजम् ॥
विचारयन्नेकदेशभाषायां[7] ग्राम्यवाचकाः ।
सन्तीति तान् समुत्सृज्य गोपस्त्रीपरिभाषितान् ॥
मृद्वालापान् समादाय रागान् सोऽपोषयन्मुदा ।
भाण्डीरभाषामादाय रीतिवृत्तिसमन्विताम् ॥

---

## भाषांतर

श्रीः । सीता व राम यांना नमस्कार असो. वाणीच्या ईश्वराला, व्यास, शार्दूल व नारद या ऋषींना व वाणीला वंदन करून भांडीरभाषेचें शुभ असें व्याकरण करितों. भांडीरदेशांत भांडीरवडाच्या शाखेखालीं तुलसीवनांत पूर्णानंदांत निमग्न झालेले व कलिंग, गौड, कंबोज, अवंति, सौराष्ट्र, मगध, व महाराष्ट्र या देशांतील सोळा हजार प्रणययुक्त गोपीजनांनीं सभोंवार वेढलेले कृष्ण रासक्रीडेनंतर श्रमनिवारणार्थ भांडीरवृक्षाखालीं जाऊन तीन ठिकाणीं शरीराला बांक आला आहे अशा ठेवणीनें उभे राहिले. वेणूवरून त्यांचें हात खालीं झाले म्हणजे त्यांच्यांत हावभावांनीं मदन जागृत करण्याचें कौशल्य होतें व वर केले असतां फार मृदु वेणुनाद ते संचारवीत. त्या गोपींसह त्यांच्या देशांतील तालबद्ध नसल्यामुळें (नुसते) वायुरूप असे निरनिराळे राग ऐकून आनंदानें पुष्कळ देशांत निर्माण झालेलें भांडीर प्रसिद्ध करण्याच्या हेतूनें—कांहीं देशांच्या भाषेंत ग्राम्य शब्द असतात हें मनांत आणून, ते सोडून फक्त गोपींनीं उपयोगांत आणलेले मृदु शब्द घेऊन—त्यांनीं आनंदानें रागांचीं रचना केली.

---

१ (०) २ (०) ३ °र्मों ४ भरितः; रेघेवर परिप्लुतः हा शोध. ५ °ष्ट्रैः ६ °न्चोर्ध्वं° ७ °नां

लोकानुग्रहकार्यार्थं गोपीनाथेन नारदः ।
प्रवर्तयति भाण्डीरमाज्ञप्तः परया मुदा ॥
स्वीकृत्यालोक्य शार्दूलं मुनिं तस्मै तदाश्रमे ।
उपदिश्य [1]गतो रागान् भाण्डीरस्यास्य[2] लक्षणम् ॥
तेन शार्दूलमुनिना नारदोक्तक्रमेण च ।
कालिङ्गगौडकाम्भोजावन्त्यसौराष्ट्रमागधैः ॥
महाराष्ट्रे च सम्भूतैर्वाक्यैः संयोज्य[3] लक्षणम् ।
तत्समं तद्भवं सूत्रप्राप्त्या प्रोक्तं सविस्तरम् ॥
अनिर्युक्तप्रबन्धानां रचनं भरतादिभिः ।
भाण्डीरभाषया प्रोक्तं[4] निबद्धेष्वपि कुत्रचित् ॥
( [5]अनिर्युक्ता [6]अतालबद्धाः ॥)[7]
अवयवहीनाः पुरुषा गुणरहितास्ते यथा न शोभन्ते ।
तद्वद्भाषारहिता रागा अपि नैव शोभना लोके ॥
गीतभाण्डे स्थिता भाषा नानादेशसमुद्भवा ।
भाण्डीरभाषा सा ज्ञेयाभीष्टा वाग्गेयकारकैः ॥
'वाङ्मातुरुच्यते गेयं धातुरित्यभिधीयते ।
वाचं गेयं च कुरुते यः स वाग्गेयकारकः ' ॥ इति रत्नाकरे
काम्भोजी मागधी गौडी माहाराष्ट्री कलिङ्गजा ।
गैर्वाणीमिश्रिता भाषा भाण्डारीति प्रकीर्तिता ॥
लाटकर्णाटकाम्भोजपदं स्याद्बिरुदाङ्कितं ।
घोषाक्षरैर्युक्तमपि मृदुश्राव्यं मनोहरम् ॥
प्रकाशार्थं गीतयोग्यं भाण्डीरमिति कथ्यते ॥

रीति व वृत्ति ह्यांनीं युक्त अशा भांडीरभाषेंत लोकानुग्रहार्थ भांडीराची प्रवृत्ति करण्याची कृष्णांनीं आज्ञा केल्यावरून त्याचा नारदानें प्रसार केला. नारदमुनींनीं त्या (भाण्डीरा)चा स्वीकार करून शार्दूलमुनींना पाहून त्यांच्या आश्रमांत त्यांना रागांचा उपदेश केला व निघून गेले. शार्दूलमुनींनीं नारदांच्या उपदेशक्रमाप्रमाणें कलिंग, गौड, कंभोज, अवंति, सौराष्ट्र, मगध, व महाराष्ट्र या देशांतील वाक्यांच्या योगानें नियम बांधून तत्सम व तद्भव यांचें सूत्ररूपानें विस्तृत व्याकरण केलें. तालबद्ध नाहींत अशा (अनिर्युक्त) काव्यांची रचना भांडीरभाषेंत करावी, क्वचित् तालबद्ध काव्यांचीहि करावी असें भरतादि ग्रंथकारांनी सांगितलें आहे. (अनिर्युक्त = अतालबद्ध). अवयवहीन व गुणहीन पुरुष ज्याप्रमाणें बरे दिसत नाहींत त्याप्रमाणें (भांडीर)भाषारहित राग बिलकूल शोभत नाहींत. नाना देशांत उत्पन्न झालेली गीतसंग्रहाचा जी गीतप्रबन्ध(वाग्गेय-)कारांची आवडती भाषा ती भांडीर-भाषा. 'मातु म्हणजे वाक्. धातु म्हणजे गेय. वाक् व गेय जो करितो तो वाग्गेयकारक' असें रत्नाकरांत वाग्गेय-कारकाचें लक्षण आहे. कंभोज, मगध, गौड, महाराष्ट्र, कलिंग, या देशांची संस्कृतमिश्र जी भाषा ती भाण्डीरी. लाट, कर्णाट, कंभोज, यांतील भाषांचा बिरुदयुक्त, घोषाक्षरयुक्त, कर्णमधुर. मनोहर,

१ त° २ °स्तु ३ °भूतः रेघेवर योज्य ४ निबन्धं° ५ आनि° ६ आता° ७ कंस मूळचे नाहींत.

तत्तद्देशाश्लीलयुतम् ('निष्ठुरं परुषं ग्राम्यमश्लीलम्' इत्यमरः)
गूढार्थं संशयास्पदम् ।
कठिनाक्षरमश्राव्यं भाण्डीरैर्नोपयुज्यते ।
गीतभाषाभिधाने द्वे भाण्डीरी भाण्डिकीति च ।
भाण्डीरदेशे या भाषा सा भाण्डीरीति कीर्तिता ।
भाण्डिका वाद्यवन्तः स्युस्तेषां भाषा च भाण्डिकी ॥
स्युर्भाषाङ्गानि चत्वारि संस्कृतं तत्समाभिधम् ।
तद्भवं देश्यमिति च देवभाषैव संस्कृतम् ॥
भाषाविभक्तिमात्रेण संस्कृतं तत्समं भवेत् ।
शार्दूलसूत्रमार्गेण वर्णव्यत्याससंयुते ॥
संस्कृतं तत्समं चैते तद्भवं स्यात्तदुद्भवात् ।
संस्कृतेच्छाविरहिता किंचिल्लक्षणलक्षिता ॥
गौडादिदेशजा भाषा या सा देश्यभिधा भवेत् ।
भाषाशास्त्राच्च लोकाच्च ज्ञातव्या सूक्ष्मबुद्धिभिः ॥
विभक्त्यर्थसमासाद्यमविरुद्धं सुयुक्तिकम् ।
लक्ष्म ज्ञेयं संस्कृतवच्चान्द्रव्याकरणादिषु ॥
( आदिशब्देन पाणिनीयकौमारजैनेन्द्रादिव्याकरणान्युच्यन्ते । )
साङ्गान्येतानि लक्ष्माणि व्याख्यास्यन्ते मयाधुना ॥

अइउण् ॥ १ ॥ ऋऌक् ॥ २ ॥ एओङ् ॥ ३ ॥ ऐऔच् ॥ ४ ॥ हयवरलण् ॥ ५ ॥ ञमङणनम् ॥ ६ ॥ झभघढधजबगडदखफछठथकपचटतय् ॥ ७ ॥ शषसल् ॥ ८ ॥ इत्यष्टौ प्रत्याहारसूत्राणि । मध्यमव्यञ्जनानि परिहृत्याद्यन्ताभ्यामेते वर्णा ग्राह्याः । यथा । अइउऋऌएओऐऔच् इत्यच्प्रत्याहारः । इत्यादयो ग्राह्याः ।

सार्वजनिक तऱ्हेनें म्हणण्याला व गीताला योग्य वचनें यांना भांडीर ही संज्ञा आहे. निरनिराळ्या देशांत जें अश्लील मानलें आहे (निष्ठुर = परुष, ग्राम्य = अश्लील – अमर), ज्यांतील अर्थ लागत नाहीं किंवा जें शंकास्पद आहे, ज्यांतील अक्षरें कठीण व जें ऐकण्याला अयोग्य त्याचा भाण्डीर ( =भांडिक ) कधींच उपयोग करित नाहींत. गीतभाषेची दोन नावें: भांडीरी व भांडिकी. भांडीरदेशाची जी भाषा ती भांडीरी. वादन-कुशल जे भांडिक त्यांची भाषा ती भांडिकी. (या) भाषेचीं चार अंगें : संस्कृत, तत्सम, तद्भव व देश्य. संस्कृत ही देवभाषाच. केवळ (लौकिक) भाषेंतील विभक्ति (किंवा लौकिक भाषा व विभक्ति) लागून संस्कृताचें तत्सम होतें. शार्दूल-ऋषि-प्रणीत सूत्रांप्रमाणें वर्णांत फेरबदल करून संस्कृत व तत्सम होतात. त्यांपासून उद्भव झाल्यामुळें तद्भव होतें. संस्कृत भाषा बोलण्याची इच्छा नसल्यामुळें झालेल्या व अल्प नियमांनीं युक्त अशा ज्या गौडादि देशांतलि भाषा त्या देशी होत. देशींचें ज्ञान भाषाशास्त्रापासून व प्रत्यक्ष लोकव्यवहारापासून शाहण्यांनीं प्राप्त करून घ्यावें. विभक्तींचे अर्थ व समास इत्यादिकांचे नियम संस्कृताप्रमाणें चांद्रव्याकरण वगैरे व्याकरणांत संगतवार व युक्तिपूर्ण अशा तऱ्हेनें मिळतात. (आदिशब्दानें पाणिनींची अष्टाध्यायी, कौमार, जैनेंद्र इत्यादि व्याकरणें सुचविलीं जातात. ) ह्या सर्व नियमांचें सांगोपांग व्याख्यान मी आतां करीत आहे.

अइउण् वगैरे आठ प्रत्याहारसूत्रें आहेत. मधलीं व्यंजनें सोडावयाचीं व पहिलें व शेवटचें उच्चारलें म्हणजे या वर्णांचें ग्रहण होतें. जसें: अच् या प्रत्याहारानें अ इ उ ऋ ऌ ए ओ ऐ औ यांचें ग्रहण

**अतान्तोऽ[१]जेकद्वित्रिमात्राप्रमाणान् ह्रस्वदीर्घप्लुतान् सवर्णतया स्वेन गृह्णाति।** अ। आ। आ३। अतान्तः किम्। अत् अकार एव। इत् इकार एव। व्यञ्जनमर्धमात्रकम्[२]। स्वरहीनं यत्तद्व्यञ्जन[३]मुच्यते। तदर्धमात्रकम्[२]। दिक्। यत्। **कुचुटुतुपवो वर्गाः**। उकारः पञ्चवर्णपरिग्रहार्थः। कु इत्युक्ते कखगघङा ग्राह्याः। एवमन्येऽपि। [४]ᳵकᳵपादिविसर्जनीया जिह्वामूलीयोपध्मानीयौ। **मिश्रो मिश्रस्थान्यखण्डः**। स्वरहल्मिश्रो वर्णो मिश्रस्थानी स्यात्। अखण्डः अविभज्यः। कि इति कण्ठ्यतालव्ययोः सवर्णः। एवमन्येऽपि। **वर्गाद्यतृतीयौ पूर्वौ**। वर्गे आद्यतृतीयवर्णौ पूर्वसंज्ञौ स्तः। क ग। **द्वितीयचतुर्थे समौ**। वर्गे द्वितीयचतुर्थौ[५] वर्णौ समसंज्ञौ स्तः। ख घ। **ञमवर्ग्योऽस्थानगणनायाम्**। कण्ठादिस्थानगणनाया अन्यत्र ञम् वर्ग्यो न स्यात्। स्थानगणनायामेव वर्ग्यः ञम् प्रत्याहारः। ऐचो ह्रस्वो नास्ति। शौरिः। तद्भवदेश्ययोः। ॠऌशष[स[६]]विसर्जनीयज्ञादयो न सन्ति। ऐजलाभो मतान्तरे। **भाषायां ह्रस्वैङ्ळदन्त्यचछजझार्धबिन्दवः सन्ति**। भाण्डीरभाषायां ह्रस्वैङ्ळकारश्च दन्त्याश्चछजझाश्च अर्धबिन्दुश्च सन्ति। ह्रस्वैङः। [७]तेंकणु। कोंकणु। ळादीनाम्। संवळु। अंचळं[८]। अंचुळं[८]। चन्द्रः[९]। चन्दिरु[१०]। अप्सराः। अच्छरा। शय्या। सेज्जा। मज्झाणं अर्धबिन्दोः। गंडभेरुंडनरेंद्रु। **आदियुक्ताधोरावगुरु-**

होतें. यावरून इतरांचें ज्ञान होईल. 'ज्याच्या अंतीं 'त' नाहीं असा स्वर ( अच् ) आपले सवर्ण जे एकमात्रक ह्रस्व; द्विमात्रक दीर्घ व त्रिमात्रक प्लुत स्वर त्यांचा वाचक आहे'. अ ह्यानें आ व आ३ यांचा बोध होतो. ज्याच्या अंतीं 'त' नाहीं हें म्हणण्याचें कारण असें. अत् म्हणजे एक 'अ'च. इत् म्हणजे 'इ'च. व्यंजनाचा अर्धमात्रा काल असतो. ज्याला स्वर नाहीं तें व्यंजन. त्याचा अर्धमात्रा काल; उदा० (दि)क्, (य)त्. 'कु, चु, टु, तु, पु हे वर्ग.' ( कु = यांतील) उकारानें ( कवर्गीय ) पांच वर्णांचा बोध होतो. कु म्हणजे क, ख, ग, घ, ङ. हीच गोष्ट इतरांची. 'ᳵक व ᳵप हे विसर्जनीय अनुक्रमें जिह्वामूलीय व उपध्मानीय होत.' ( ह्यांचा प्रत्याहारसूत्रांत उल्लेख नाहीं, पण वर्णपूर्तीकरितां टीकाकारानें केला आहे.) 'मिश्रवर्ण मिश्रस्थानापासून उत्पन्न झालेला असतो व त्याचें पृथगुच्चारण करितां येत नाहीं.' स्वर व व्यंजन ह्यांच्या मिश्रणानें झालेला वर्ण मिश्रस्थानापासून झालेला असतो. अखंड = अविभागार्ह. 'कि' हा कंठस्थानीय व तालुस्थानीय वर्णांचा सवर्ण आहे. हीच गोष्ट इतरांची. 'वर्गांतील पहिला व तिसरा हे पूर्व.' वर्गांतील पहिल्या व तिसऱ्या वर्णांना पूर्व ही संज्ञा आहे, जसें क, ग. 'दुसरा व चवथा हे सम.' वर्गांतील दुसऱ्या व चवथ्या वर्णांना सम ही संज्ञा आहे; जसें, ख, घ. 'ञम् ( म्हणजे ञ, म, ङ, ण, न ) हे वर्ग्यांपैकीं नव्हेत, स्थानाचा विचार करणें नसेल तर.' कंठ्य वगैरे स्थानविचार करावयाचा नसतांना ञम्-प्रत्याहारांतील वर्ण वर्ग्यांपैकीं समजूं नयेत. स्थानगणनेच्या वेळींच ञम्-प्रत्याहार वर्ग्य होतो. ऐच् (ऐ, औ ) ह्याचा ह्रस्व नाहीं; उदा. शौरिः. तद्भव व देशी भाषांमध्यें ॠ, ऌ, श, ष, ( स?, ) विसर्ग, व ज्ञ आदि वर्ण नाहींत. दुसऱ्या मतीं ऐ, औ, हि नाहींत. '( भांडीर )भाषेंत ह्रस्व ए व ओ, ळ, दंत्य च, छ, ज व झ, व अर्धबिंदु आहेत.' भांडीरभाषेंत ह्रस्व ए व ओ, ळ, दंत्य च़, छ़, ज़ आणि झ़ व अर्धबिंदु आहेत. ह्रस्व ऍं व ऑ यांचीं उदाहरणें: तॅंकणु, कॉंकणु. ळचीं उदाहरणें: संवळु इत्यादि. दंत्य च़ छ़ ज़ झ़ चीं... चन्द्र इत्यादि. अर्धबिंदूची गॅंड भॅरुंड इ. 'शब्दारंभीं असलेल्या संयुक्त वर्णानें व संयुक्त व्यंजनांत शेवटीं

१ °नै° २ अइ मातृकम्. ३ °मित्यु° ४ अइ कपादि° ५ र्थं°– ६ अइत स आहे, पण नको. ७ त्रें° ८ °लं ९ चंद्रः १० चंदि° ( हे दोन्ही खरे पाठभेद नव्हेत. अशा लेखकानें अनुस्वारांच्या ऐवजीं अनुनासिक स्पर्श घातले असतील इतरत्रहि हाच प्रकार आहे म्हणून हे पाठभेद दिले नाहींत.

**त्वहेतुकौ** । आदिवर्तमानसंयुक्तवर्णश्च । अधररेफश्च । एतौ स्वपूर्व[1]वर्णस्य गुरुत्वहेतुकौ न स्तः । भाषायामिति वर्तते । घनशुति । समुद्रु । नरेन्द्रु । चन्द्रु । **अग्राधरयोरज्झलौ** । संधिपरिवृत्त्यादिषु वर्णमिलने क्रमादज्झलौ अग्राधरयोर्लेखनीयौ । दध्यन्नं । दद्भन्नं[2] । वाराणसी । वाणारसी । **अज्झलावज्झलोरादेशे** । आदेशविधाने अज्झलोः स्थाने अज्झलौ स्तः । अनन्तं । इनन्तं । [3]नारेयणु । [4]विशे । **हलो हलन्तविधिः** । वर्णानां हलन्तरूपविधिः । हलः स्थानस्यैव । ह इत्युक्ते हकारस्यैव[5] लोपः । तत्संबान्धिनः अचो न लोपः । महाराजा । माराजा । **साचोऽजन्तविधिः** । अजन्तरूपविधिः स्वरयुक्तहलः स्थाने स्यात् । वेन इत्युक्ते । अकारवकारयोर्विधिः । अवतंसम् । ओतंसं । **सं संस्कृते** । संस्कृते सम् इति संज्ञा स्यात् । **तत्समे तत्सः** । [6]तत्समे तत्स[6] इति संज्ञा । **तद्भवे तज्जः** ॥ इति संज्ञाधिकारः ॥

**बहुलम्** । अयमाशास्त्रपरिसमाप्तेरधिकारः । अत्र भाषायां प्रोक्तं लक्षणं बहुलमिति ज्ञेयम् । पुष्करम् । पोख्खरं । संधी द्वौ स्वरसंधिर्हल्संधिश्चेति । हल्संधिः संस्कृतवत् ।

---

येणाऱ्या रकारानें ( मागल्या स्वराला ) गुरुत्व येत नाहीं.' आधीं असलेला संयुक्त वर्ण व पुढील रेफ हे आपल्या आधीं असलेल्या वर्णाच्या गुरुत्वाचे हेतु होत नाहींत. भाषायां हा अधिकार येथेंहि आहे. उः—घनशुति (˘˘˘˘) समुद्रु (˘˘˘) नरेंद्र (˘˘˘), चंद्र (˘˘). ' आधीं व मागाहून स्वर व व्यंजनें.' संधि व वर्णांची उलटापालट इत्यादि कार्यें होऊन वर्ण पुनः एकत्र करितांना ( राहिलेलीं ) स्वर व व्यंजनें क्रमानें आधीं व मागें घ्यावयाचीं; उ. दद्भन्नं (येथें दधि+अन्नं येथें 'ध्य'चा 'द्भ्' करून क्रमप्राप्त स्वर पुढें घ्यावयाचा. हें संधीचें उदाहरण ); वाराणसी – वाणारसी (येथें र व ण यांची उलटापालट करितांना त्यांच्या स्वरांचा क्रम उलटून वाणरासी करावयाचें नाहीं. हें परिवृत्तीचें उदाहरण ). ' स्वर व व्यंजनें यांच्या स्थानीं आदेश सांगितले असतां ( क्रमानें ) स्वर व व्यंजनेंच (आदेश येतात). आदेशाचें विधान केलें असतां अच् ( स्वर ) व हल् ( व्यंजनें ) यांच्या जागीं स्वर व व्यंजनें येतात. अनंत याच्या अ च्या ठिकाणीं इ येऊन इनंत होतें. नारायण यांतील रा चा रे होतो. विषय (?) ह्यांत 'ष' चा श होतो. ' व्यंजनान्ताविषयीं विधि व्यंजनाचा. ' वर्णपैकीं व्यंजन अंतीं आहे अशा रूपाचा विधि हा व्यंजनाच्या जागीं येणाऱ्या कार्याविषयीं असतो. उदाहरणार्थ ह् चा लोप होतो असा नियम असतां तें कार्य ह् ह्या व्यंजनाचें असल्यामुळें त्याच्यापुढील अकाराचा लोप होत नाहीं; उ० महाराजा, माराजा. ' स्वरयुक्त पदाचा विधि स्वर अंतीं असलेल्या वर्णाचा'. स्वर अन्तीं असलेल्या रूपावरून सांगितलेलें कार्य स्वरयुक्त व्यंजनाचें होतें; उ. ' व नें ' असें सूत्रांत असेल तर व् + अ ह्याविषयीं तो विधि आहे असें समजावें; ( पुढें आदिवर्णाचा ओ होतो म्हणून सांगितला आहे तो व चा होतो; उ० ) अवतंसं—ओतंसं. ' संस्कृत या अर्थी सम्. ' सम् ही संस्कृत ह्या अर्थी संज्ञा आहे. 'तत्समाच्या अर्थी तत्स.' तत्समाची तत्स ही संज्ञा. ' तद्भवाच्या अर्थी तज्ज ( ही संज्ञा आहे )

येथवर संज्ञाप्रकरण झालें.

'विकल्पेंकरून'. हें अधिकारसूत्र हें व्याकरण संपेपर्यंत लागू पडतें. ह्या (भांडीर)भाषेविषयीं सांगितलेल्या नियमांचें कार्य विकल्पानें होतें असें समजावें; उ० पुष्कर (याच्याठिकाणीं सांगितलेलें देशी रूप ) पोख्खर (हें उपयोगांत आलेंच पाहिजे असा नियम नाहीं. पुष्कर–शब्दाचाहि उपयोग

---

१ °वर्णा वर्ण° २ अ (०) ३ नारा° ४ विशेषु ५ अ स्येव ६ अ (०)

स्वरसंधिर्यथा । **ओरच्युवः संधौ** । संधावचि परे । उकारस्य उव इत्यादेशः स्यात् । कृष्णुवानंदकरु । **आदृक्यरलौ तत्से** । तत्समे अकारात् ऋकि परे सति क्रमात्तयोः अर् अल् एतौ स्तः । षष्ठ्यभावात्पूर्वपरयोरादेशौ । वसन्तर्तु । हृस्वल्कारु । भाषायाम् । वसंतऋतु । न्हस्वऌकारु । **पररूपं वान्याचि** । अकारादन्याचि परे पररूपं वा स्यात् । [1]देवीसरु । देवेसरु । देवेश्वरः । देवुत्तमु । देवोत्तमु । देवोत्तमः । वालैणु । बालेणु । बालैणः । देवोघु । देवौघु । देवौघः । **प्रत्ययवीप्सादेशेषु च** । प्रत्ययादिषु परेषु वा[2] पररूपं स्यात् । प्रत्ययो । तुझआणं । तुझाणं । त्वदीयम् । वीप्सायाम् । अनुअनु । अन्नु । अन्योन्यम् । एकुएकु । एकेकु । एकैकेम् । ऐखुनिऐखुनि । ऐखुनैखुनि । आकर्ण्याकर्ण्य । आदेशे । कृष्णुवानन्दु । कृष्णस्यानन्दः । पर्वतिले । पर्वते । बहुला-धिकारात् । हरिइले । हरौ । **संधिर्नैकाक्षरात्** । प्रत्ययादिषु परेषु । एकाक्षरात्पररूपादि संधिकार्यं न स्यात् । तेणेउजळि । तेनोज्ज्वलितम् । तो अच्चरिजु । रै अगारम् । नौ आगमनं । **संबुद्धिप्लुताभ्यां च** । अचि परे संधिर्नास्ति । राम अवधारय । राम३[3] आगच्छ । **अव्ययहलः संवत्** । अव्ययान्तहलः अचि परे संधिकार्यं संस्कृतवत् ।

---

होणें शक्य आहे ). संधि दोन तऱ्हेचे असतात; स्वर संधि व व्यंजनसंधि. ( यांत ) व्यंजनसंधि संस्कृतांतील व्यंजनसंधीप्रमाणेंच होतात. स्वरसंधि पुढीलप्रमाणें. 'संधि करतांना स्वरापूर्वी ' उ ' चा उव ( होतो ).' संधि करणें असतां स्वर पुढें आला असतां उकाराच्या स्थानीं उव असा आदेश येतो; उदाहरण: कृष्णु + आनंदकरु = कृष्णुवानंदकरु. 'तत्समांत ' अ ' नंतर ऋक् (ऋ ऌ) पुढें आले असतां अर् व अल् होतात.' तत्समांत अकारापुढें ऋक् ( म्हणजे ऋ ऌ ) पुढें आले असतां अनुक्रमें त्यांचे अर् व अल् हे होतात. षष्ठी (असती तर अमुक एकाच्या जागीं अमुक असा अर्थ झाला असता, पण ती) नाहीं म्हणून पहिलें अक्षर (अ) व पुढील (ऋ किंवा ऌ) या दोहोंच्या जागीं (अर् व अल् हे) आदेश येतात; उ० वसन्तर्तु; हृस्वल्कारु; (भांडार)भाषेंत वसंतऋतु, ह्रस्वऌकारु. 'दुसऱ्या स्वरापूर्वी विकल्पानें पररूप होतें.' अकाराहून दुसरा स्वर पुढें आला असतां पररूपसंधि (पुढील स्वराचेंच रूप होणें) विकल्पानें होतो; उ० देवेश्वर यापासून देवीसरु व देवेसरु; देवोत्तम यापासून देवुत्तमु व देवोत्तमु; वालैण यापासून वालैणु व वालेणु; देवौघ यापासून देवोघु व देवौघु. 'तसेंच प्रत्यय, वीप्सा व आदेश यांपूर्वी.' प्रत्यय इत्यादिक पुढें आले असतां विकल्पानें पररूप होतें; प्रत्ययांपूर्वी ह्याचीं उदाहरणें:–त्वदीयं ह्याच्यापासून तुझआणं व तुझाणं. वीप्सा (प्रत्येकाला व्याप्त म्हणजे अंतर्भूत करण्याची इच्छा ) हिचीं उदाहरणें:– अन्योन्यं पासून अनुअनु व अन्नु, एकैकं पासून एकुएकु व एकेकु, आकर्ण्य पासून ऐखुनिऐखुनि व ऐखुनैखुनि. आदेशाचीं उदाहरणें:–कृष्णस्यानंदः यापासून कृष्णुवानन्दु; पर्वते यापासून पर्वतिले. बहुलं असें प्रथमारंभीं सूत्र असल्यामुळें ( येथेंहि विकल्प आहे म्हणून) 'हरौ' पासून हरिइले होतें (पण पररूपसंधीनें हरिले होत नाहीं). 'एकाक्षरी शब्दानंतर संधि नाहीं'. प्रत्यय इत्यादिक पुढें आले असतां एकाक्षरी शब्दानंतर पररूपादि संधि करूं नयेत; उ० तेणेउजाळि = तेनोज्ज्वलितम् ; तो अच्चरिजु (तें आश्चर्य); रै अगारम् ; नौ आगमनं. 'संबोधनं व प्लुति ज्यांत आहे अशा शब्दानंतर'– पुढें स्वर आला असतां संधि होत नाहीं; उ० राम अवधारय; राम३ आगच्छ. 'अव्ययांतील व्यंजनाचे संधि संस्कृताप्रमाणें'. अव्ययाच्या अंतीं येणाऱ्या व्यंजनाचे

---

१ देवि° २ अइ (०) ३ अइ राम

# ऐतिहासिक

## अलीबहादर यास उत्तर हिंदुस्थानांतील कारस्थानासंबंधीं पाठविलेलीं पत्रें

(स. मा. दिवेकर)

श्री

(२-१-८९)

पौ छ २६ जलोवल माघ तिसा समानीन

राजश्री अलीबाहादर गोसावी यासी

छ सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो बालाजी जनार्दन आसिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष तुम्ही छ १७ सफरचे पत्र पाठविले ते पावले पाटीलबावास मेजवानी केली हत्ती घोडा जवाहीर व वस्त्रे दिल्हीं लोकास त्यानी याद दिल्ही त्या प्रो पोशाक दिल्हे दुसरे दिवसी आंम्हास बोलावून सागितले कीं आपण दिल्लीस जावे तेथील बंदोबस्त करावा सरकारी मुलूक आम्हांकडे चालीस लक्षाचा आहे व बातशाहाकडे चालीस लक्षाचा व बातशाही सरदार याजकडे जायदाद सासष्ट लक्षाचा आहे आम्हाकडे मुलूक आहे त्यांची वाटणी आंम्हास नको आंम्ही घेत नाही सरकारांत लाविनो आमचे भाऊ सुभेदार त्यांस वाटा सरकारांतून द्यावयाचा असल्यास द्यावा आमचा आग्रह नाही बातशाही मु + + आहे तो त्याचे खर्चास पाहिजे व जा + दाद वाल्याचा त्यांजकडे राहील असे बोलणे त्यास सरकारांत मुलूक देणार तो उज्याड आहे पाटीलबावाचे म्हंणे की पुण्यास लिहून आणखी फौज आणवावी व खर्चाची तजवीज करवा आणि मुलकाचा बंदोबस्त राखा आंम्ही उतर केले कीं तेथून खर्चास येणे त्यास सरकारांत वोढ कोणे तरेची ही आंम्ही पाहिली आहे आपणासही माहीत आहेच तेव्हा तेथे खर्चाविसीचे काय ल्याहावे आपण खर्चाची सोय करवावी दिलीस जाण्याचा प्रकार त्यास आंम्हास आज्ञा आहे कीं पाटीलबावा सांगतील त्या प्रो (करा) वे त्यापक्षी आपण जिकडे पाठवितील तिकडे जावयास सिध आहो खर्चाची मात्र बेगमी करावी वद्य चतुर्दसीस कुच करून जातो असे सांगितले पाटीलबावा बोलले तुंम्ही सरकार आमचे कुमकेस आंला तुंम्हाजवळ चौघडा व जरीपटका नाहीं आम्ही देतो आम्ही उतर केले की आंम्हास सरकारची आज्ञा नाही आंम्ही घेत नाही चाकरी सागाल ती करू तेव्हा बहूत आग्रह केला आणि आमचे डेन्यास येऊन चौघडा व जरीपटका दिल्हा खर्चाची वोढ फार लोक नालबंदी करितां गवगवा करितात यास्तव रोजमरे याची व नालबंदीची तरतूद जाली पाहिजे गुलाम कादर यास राणेखान भाई याणी मेरटेत कोंडला आहे लढाई दररोज चाललीच आहे पाटीलबावाचे म्हंणे की गुलामकादराचे पारपत्य इतक्यांत जाले तर बरे नाही तर आपण जाऊन पारपत्य करावे म्हणौन व इसमालबेग व नजबकुली याची लढाई होत आहे म्हणौन लिहीले सविस्तर कलले त्यास पाटीलबावास मेजवानी केली उत्तम केले दिलीस जाण्याचा व मुलकाचा मजकूर लिहीला त्यास





तुंम्हास तिकडील माहीतगारी नाही प्रथम जाणे या करता दिलीचा व मुलकाचा बंदोबस्त पाटीलबावानी करावा हिंदुस्थानांत आजपर्यंत मुलूक मेलविला व बंदोबस्त करून नक्ष पाटीलबावानी म्हणूनच राखिला व त्याची जरवही तिकडे आहे म्हणौन सरदार वगैरे यांसी रुजू आहेत दुसऱ्याचा टिकाव तेथे व्हावयाचा नाही सरकारी मुलकाचा व बादशाही + व जायदादवाल्याकडील मुलकाचा + बोले त्यास येविसी पूर्वीच पाटीलबाबानी लिहीले होते त्याची उतरेही येथून नवा मुलूक सुटला आहे त्याचा बदोबस्त करावा म्हणजे सुभता पडेल तुंम्हाकडे मुलूक देऊ लागल्यास तुम्ही घेऊ नये पाटीलबावा बंदोबस्त करितील सरकारचे वोढीचे प्रकार तुंम्ही चांगले वोलण्यात आणिले फौज दुसरी आणवावयाचा प्रकार बोले त्यास सरकार वोढीचे प्रकार पाटीलबावास माहीत आहेतच त्याअर्थी दुसरे फौजेची तरतूद करणे त्यास पैका पाहिजे ती गोष्ट अनकूल नाही तेंव्हा तरतूद कसी होत्ये पाटीलबावानी बंदोबस्त केलाच आहे पुढे तेच करतील येविशीचे सविस्तर अर्थ पाटीलबावांस व तुंम्हास पूर्वी लिहीलेच आहे त्या अन्वये जाले असतां कोणतेही गोष्टीचे कमी पडणार नाही पाटीलबावा दुरदेश व मनसबा जाणतात त्या अर्थी करणे ते समजोन करितील सर्व भार त्याजवर आहे चौघड्याचा व जरीपटक्याचा मजकूर लिहीला त्यास उत्तम जाले दिलीस जावयाचा प्रकार लिहीला त्यास दिलीचा वदोबस्त पाटीलबावा करितील गुलामकादराकडे जाण्याची गोष्ट तुंम्हासी बोललेच आहेत तिकडे तुम्ही जावे होईल ते लिहून पाठवावे + रा छ ५ राखर वहूत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

श्री

पौ छ ७ जमादिलावल (८-१-८९)
मु॥ दाहाणा प्रा डासना
सण तिसा समानीन
मास माघ

राजश्री अलीबाहादर गोसावी यांसी

छ॥ सकल गुणालंकरण अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री॰ बालाजी जनार्दन आसिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष तुम्ही छ १ रबिलोवलचे पत्र पाठविले ते पावले राजश्री पाटीलबावानी आम्हास मथुरेहून गुलाम कादराचे पारपत्यास रवाना जालो + + सबलमगडानजीक पोहोचलो पुढे फरिदाबादे जवल यमुना उतरून पार जलद जात असो पाटीलबावांची पुढे फौज आहे त्यांची व गुलाम कादराची लडाई सुरू आहे म्हणौन व इस्मालवेग व नजफकुली यांच्या भेटी जाल्याचा व जोधपूरकर व जैपूरकर राजे यांजकडील वकील सलुखाचा पैगाम घेऊन आले होते त्यांचे बोलणे जाले त्याचा व तुम्ही उतरे केली तो मजकूर लिहीला तो सर्व कलला त्यास गुलामकादरावर रवानगी केली चांगले आहे आजपर्यंत तुम्ही जाऊन लडाया होऊन जेर जालाच असेल सविस्तर लिहून पाठवावे नजफकुली व इस्मालबेग भेटले पुढें काय करणार

हे त्याहावे उभयतां राजे यांजकडील वकील बोलतात उत्तम आहे तुम्ही बोललांत ठीकच आहे त्याचा इतला पाटीलबावांस केलाच असेल नसल्यास करावा अजमेर घ्यावी व सालाबादी खंडणीचा वगैरे जावसाल उरकून दिल्ह्यास चांगले परं व गुलामकादराचे पारपत्य जाले म्हणजे कबूल करितील + असे वाटते तुम्ही बोलण्यांचे संधान लाविलेच आहे होईल ते वरचेवर लिहीत जावे रा छ ११ रााखर वहूत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

श्री

पौ छ १ जमादिलावल (१६–१–८९)
मास माघ
मु॥ दाहाणा सन तिसा समातीन

श्रीवेंकटेश प्रसन्न

श्रीमंत अलीबाहुदूर बावा यासि आश्रित मुकुंद जोसी आशीर्वाद ॥ उप ॥ यथील क्षेम आपुलि स्वकुशल लिहित जाणे येथील वर्तमांन पुष्य वद्य ५ शुक्रवार पर्यंत यथास्थित असे अपले वर्तमांन श्रेयस्कर अैकुन बहुत संतोष झालो ॥ श्रीमत नानाने संतोष झाला ॥ सदैव असाच संतोष इछितो ॥ यथील व दर्वारांत श्रीवेंकटेश आहे ॥ सदैव पत्री लिहित जाणे ॥ बहुत काय लिहिणे ॥ हे आशिर्वाद

आपणास ग्रहयोग चांगला आहेत

---

श्री

राजेश्री अपाजिपंत यासि मुकुंद जोसी आशीर्वाद[१]

श्रीगणराज

पौ छ २२ जाखर (४–३–८९)
सन तिसा मु॥ मथुरा

साहेबाचे शेवेसी दिनकर बलाल गोरे कृतानेक विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ ६ जमादिलाखर साहेबाचे दयेकरून यथास्थित असे विशेष आलीकडे कृपापत्र येऊन परामृष होत नाहीं तरी निरंतर पत्र लिहावयास आज्ञा होऊन सांभालिले पाहिजे यानंतर पंनास हजारांचे वरातेचा ऐवज हरीकर्णाचे पदरी पडला हाली पाऊण लाखाची वरात आली तोही देवितो म्हणौन च्यार पाच वेल उतरे जाली पावल्यावर सेवेसी लिहून पाठवीन श्रीमत राजश्री नानानी फालगून शुध ३ दुसरे लग्न केले पुण्यातच जाले नवरी दहा वर्षाची आहे श्रीमत मातुश्री महाराज साहेबाची + + त हाली बरी आहे श्रीमत राजश्री दादासाहेब व प्यारीसाहेब खुशाल आहेत विदित व्हावे + + + काय लिहू कृपा केली पाहिजे

---

१ सर्व पत्र बालबोधींत असून न्हस्व दीर्घ जशाच्या तसें ठेवून नकल केली आहे.

हे विज्ञापना मथुरेस आल्याची पत्रे सरकारात काल आली त्यावरून कलले श्रीमंत माहाराजास जे (ने ?) वत व सिखाचा मजकूरही आलीकडे कलत नाही श्रीमंत राजश्री नाना आठ दिवस जाले मजपासी बोलले फार पुढे वाढले हे ठीक नव्हे यश मिलविले आतां स्वस्थ आलीकडे बसोन कर्तव्यार्थ करावा म्हणजे ठीक तेव्हां मी बोलो की राजश्री पाटीलबावाची फौज पुढे गेली तेव्हा आपली फौज देणे प्राप्तच आहे म्हणौन फौज काही त्यांजबरोबर ठेऊन आपण मथुरेस येणार असे आहे तेव्हा बोलले की हो त्याची फौज पुढ आहे ते प्राप्त खरे परंतु बहूत पुढे जाण्याविसी बहूत विचारे करून करावे सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञापना.

---

श्री

(४ - ३ - ८९)

सहस्रायु चिरजीव राजमान्य राजश्री अलीबाहादूर यांसी आसिर्वाद उपरी येथील कुशल तागाईत छ ६ जमादिलाखर पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष आपण छ १२ जमादिलोवलचे (८-२-८९) जुजाचे मुकामचे पाठविले ते छ २९ जमादिलोवली पावले दो चौ रोजानी मथुरेस पोहचतों म्हणौन पत्री लिहीले ते कळलें प्रस्तुत मुक्काम कोठे आहे व सिखाचा मार काय आहे तो ल्याहावें इकडील वर्तमान तर राजश्री नानानी छ १ जाखरी (२८-२-८९) दुसरे लग्न केलें हरीकर्णाची पाऊण लक्षाची वरात पाठविली ती अद्याप पटली नाही लगट करून ऐवज मारचे पदरी घालवितो पेशजी दोन वराता आल्या त्याचा ऐवज झाडून त्यास पावला घरची वरात सात हजारांची पाठविली तेही रुपये येका दो रोजात त्यास देतो आमची प्रकृत सद्या बरीच आहे दुखण्यात बहुत विपत्य पाहिले दोन महिने स्नान व सूर्यदर्शन नाहीं असे क्लेश जन्मात पाहिले नवते चिरंजीव प्यारी बेगम व राजश्री दादासाहेब खुशाल आहेत पत्रे आलीकडे येत नाही म्हणौन पत्रीं लिहीले त्यास महिन्यात तीन चार पत्रें हमेशा जातात आपणास पोहचतात किंवा वाटेस गाहाळ-होतात हें काहीच कलत नाही दुखण्यातून बरी जाहालो ते दिवसापासून क्षणक्षणा मनात येते कीं तुम्ही भेटावे ईश्वर असा कोणता दिवस दाखंवील की जा दिवसी तुम्ही भेटाल भेटण्याची युक्त काय करावी बहूत काय लिहीणे हे आसिर्वाद या माराचा कागद रा आपाजी बाबाजी याचे जासुदाजवल आजच दिल्हा कागद पोचत नाही यास्तव एकाच माराची पत्रे दोन लिहीली आहेत.

छ २२ जाखर सन तिसा मुा मथुरा

---

श्री

पौ छ २० रजब (१५-३-८९)
सन तिसा समानीन
चैत्र मास
मुा मथुरा सायकाल
पुा राजश्री अलीबाहादर गोसावी यांसी

आसिर्वाद विनती उपरी गुलाम कादर पलाला होता त्याचा शोध राजश्री आपाजीपंत दामले याणी लाविला तिकडे फौज रवाना करून त्यास धरून आणिला त्या समई माारनिलेनी येक गाव गंगथडी प्रांती मागीतला तेव्हां आम्ही मान्य केलें की पुण्यास लिहून देवितो म्हणौन लि॥ त्यास आपाजीपंतांस पालखी द्यावयाविसी पूर्वी तुम्ही लिहीले होते त्याचे उत्तर तेथून पाठविले होते की मोठे येखादे कामकाज जाल्यावर द्यावयास येईल त्यास हे काम चांगले केले याजकरतां त्यांस पालखी द्यावी राजश्री येशवतराव नाईक निबालकर यांचे लोकानी गवगवा बहूत केला आणि येकलक्ष रुपयांची हुडी पुण्यास द्यावी म्हणून बोलले बहूत सांगितलें परंतु न ऐकत तेव्हां लाख रुपयांचे पत्र लिहून दिल्हे त्याचा तपसील लिहीला तो कलला त्यास तुम्ही लिहील्या अन्वयेच होईल चिता नाही + रा छ १७ जाखर हे विनंति[1]

---

श्री

पौ छ २५ रमजान (२५-५-८९)
मुा मथुरा सन तिसैन
मास जेष्ट

पुा राजश्री अलीबहादर गोसावी यांसी

आसिर्वाद विनंती उपरी राजश्री पाटीलबावा पंचवीस लाख रुाो आपणांजवळ कर्जाऊ मागतात दो वर्षांत फेडू नाही तर सरकारचे फौजेने दोन वरसे राहावे मागती आम्ही देसीहून येऊ आणि संभालू असे राजश्री सदाशिवपंतांस लिहीले परंतु इकडे + रूर राहातील आगरे रामगड वगैरे मुलूक रा + + अंबोजी इंगले यांचे स्वाधीन करून आपण उजनीस यावे हाही बेत आंहे गंगाजी आवाड यास आम्हांकडील जाबसाल कळत नाही येविसी लि + त होते येथील मर्जीची माहीतगारी आपणास पुरती आहेच आम्ही यांचे हुकमात आहो खडणीपैकी वांटणी देत नाहींत कदाचित हे उज + + आले तर आम्ही कसे करावे हे लिहीले पाहिजे अ + + देण्याचा बेत कदाचित ठरला तर पके करून घ्यावे नाहीतर येखादा सरदार ठेऊन आपण येतील म्हणून लिहीले त्यास ऐवज द्यावाच असे ठरले नाही पाटीलबावानी सदाशिवपंतास लिहीले होते त्यास आम्हीहि सदासीवपंतास

---

१ पत्र नाना फडणवीसांचें.

बहूत प्रकारे सागून लिहीविले आहे जर त्याणी कबूल केले असे जाले तर थोडी बहूत सोय काढावयास येईल असे सागून माारनिलेची पत्रे पाठविली आहेत त्याची उतरे आल्या-वर करणे तसे करावयास येईल पाटीलबावानी तिकडे राहावे येविसी त्यांस व तुम्हास पूर्वी वारंवार लिहीण्यात आले आहे त्याप्रो पाटीलबावांसी बोलावे आणि राहाणे घडवावे इतकेही असोन न राहिले तर तुम्ही राहू नये त्याचे बराबर यावे झासीपर्यंत आल्यावर आल्यावर इकडे लिहून पाठवावे येथून पुढें लिहीले जाईल त्याप्रो सरकार माहालाचा बदोबस्त करून द्यावा पाटीलबावांचे राहाण्याचे पके ठरल्याशिवाय ऐवज कसा देऊ तुम्ही चागली कल्पना घेतली असे न घडे असे नाही जे होणे ते समजोनच होईल वरचेवर होईल ( ते ) लिहीत जावे + तुम्ही आपले फौजेस खर्चास मा + + त जावे रा। छ २९ साबान हे विनंती[1]

---

श्री

( १५-६-८९ )

सहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री अलीबहाद्दूर यांसी आसिर्वाद उपरी येथील कुशल तागाईत छ २० (?) रमजानपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष आपण छ ३० साबानचे पत्र डाकेवरावर पाठविले तें छ १४ रमजानी पावले राजश्री सदाशिवपंत... ठणार व चिरंजीव राजश्री गनीबेग तिकडेच आहेत व सिखाची गलबल आहे म्हणौन लिहीले त्यास तिकडे फौज ठेवाल ती बहूत बंदोवस्तीने ठेवावी पेशजी हरीकर्णाची जोडी गेली त्यावरावर वराताचा मजकूर लिहीला आहे त्यावरून कलेल हरीकर्णाचे बोलणे होते की लस्करांत तीन लक्ष रुो जाले आहेत आणि येथे दिवस गत्ये तरी आतां वरात आणऊ नये मग आम्ही त्यास सांगितले की वरात येऊ देऊ नये तर पुढे येकदांच भरणा बहूत होऊन दुवारा होईल यास्त [ व ] लक्ष्करात लिहून पाठऊ नये आम्ही राजश्री नानाचे कानावर घाली नंतर आज्ञा होईल त्याप्रमाणें करूं ऐसे सांगोन नंतर वाो रा। जोसीबावाकडून कानावर घातले कीं तीन लक्षाचा भरणा लस्करांत जाहाला आहे त्यास तेथे वरात आल्यावर फिरली तरी सावकाराचा आव राहणार नाही यास्तव तिकडेच बंदो-वस्त करून ऐवज घ्यावया .............................. येणार नाहीत वरात आल्यावर मात्र फिरऊ नये मग उतर केले की सोई सोईने येथेंच रु॥ देऊ वराता येऊद्या त्यास पेशजी पंनास हजार पाऊणलक्षाच्या वराता येत आल्या त्या प्रो पाठवीत जाव्या त्याज वरून हरीकर्णाने मुजरद कासीद जोडी पाठविली आहे सरकारांत ऐवजाची वोढ फार आहे मागे वराता आल्या त्या अद्याप पटल्या नाहीत चिरंजीव प्यारी बेगम व रा। दादासाहेब व सर्व खुशाल आहेत बहूत काय लिहीणे हे आसिर्वाद[2]
पाो छ २३ रमजान तिसैन + + जेष्ट मु॥ मथुरा

---

१ पत्र अलीबहाद्दुरांच्या मातोश्रींचें. २ पत्र नाना फडणविसांचें.

श्री

( १९-६-८९ )

पौ छ १५ सवाल तिसैन

आशाढ मुा श्रीमथुरा

राजश्री अलीवाहादर गोसावी यांसी

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रो वालाजी जनार्दन आसिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावे विशेष तुम्ही छ २५ सावानचे पत्र पाठविले ते पावले राजे ( हिंदु ( प ) त बुंदेले मृत्य पावल्यावर त्यांचे पुत्र ढोकलसिंग व सरनेतसिग यांचे ( वय ) लाहान असे जाणून पटाईत याणी + + + फितुर व वैदा करून राज्याचे कारभारी + + बेणी हजुरी वगैरे होते त्यांस जिवे मा ( रून ) ठांई ठांई ठाणी वलकाऊन बसले आहेत ( त्या ) स राज्याचा भाई-चारा पूर्वीपासून सरकारांत व तेही आजपर्यंत सरकार लक्षात चालत आले यास्तव त्यांसी ज्याणी लबाडी केली आहे त्याचे पारपत्य होऊन राज्यांची स्थापना यथास्थित व्हावी येणेकरून सरकारात काही मुलूख येईल व च्यार रुपयेही मिळतील वहुत सायास लागाव-याचे नाहींत सरकारांतून ही मसलत नेमिलीयास राजश्री पाटीलवावांचा तिकडे फौज पाठवावयाचा मनसवा आहे मर्जी असेल तसे लिहुन पाठवावे म्हणौन लिहीले ते कळले त्यास बुंदेल्यांचा घरोवा श्रीमंत कैलासवासी बाजिराव साहेबांपासून सरकारांत चालत आला व तेही सरकार लक्षाने चालतात हे संस्थान सरकारचे त्याचा बंदोवस्त सरकारांतून व्हावा हे मनातच होते तेच तुम्ही लिहीले फार उत्तम आहे सरकारचे संस्थान सरकारातून बंदोवस्त करीत असतां पाटीलवावाही मन घालणार नाहींत तुम्ही फौजसुधां गेले असतां चांगले होईल त्यास प्रस्तुत तिकडे मसलत वि ( शे ) ष नाहीं तेव्हां युक्तीनेंच पाटीलवा-( वासी ) वोलून जावयाचे करावे मुलूक + + का मिळेल म्हणून लिहीले हे खरे आहे + + लावया जोगेच आहे असे जाणूनच + + दोन पत्रे तुमची आली त्याची उत्तरे + + की पाटीलवावा तिकडे राहात नाहीं + + येऊच लागले तर तुम्ही ग्वालेर पावेतो त्याजवरावर येऊन लिहून पाठवावे बुंदेलखंड व झासीकडे काम आहे त्याविसी लिहून पाठऊ असे लिहीले त्याचे कारण हाच वंदोवस्त करावयाचा यांत नफा आहे हे जाणून लिहुन पाठविले त्यास तुम्ही हा वंदोवस्त करावा मागाहून आणखी मामलतीचे बंदोवस्त होऊन चौकसी करावयाची आहे त्याचे लिहून पाठऊ बुंदेल्याकडील मसलत करावयाची त्यास खर्च आंगावर न येतां ज्यांत नफा व राज्याचा वंदोवस्त व कोणी दरज न ठेवी असे करावे वर्तमान वरचेवर लिहुन पाठवीत जावे रा + छ २४ रमजान वहुत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

श्री

प्रो छ १५ सवाल (१९-६-८९)
तिसैन आशाढ
मु॥ श्री मथुरा
राजश्री अलीबाहाद्दर गोसावी यांसी

आसिर्वाद विनंती उपरी मथुरा वृंदावन दोन्हीं क्षेत्रे सरकार खालशांत करून घ्यावी येविसीं राजश्री पाटीलबावांसी बोलावे म्हणून पूर्वी आपणास लिहीलें होते त्यावरून दोन्हीं गांवच्या मात्र सनदा पाटीलबावा आणविणार म्हणून राजश्री भिकाजीपंत याणी लिहीले त्यास दोन्ही क्षेत्री देवालये व स्थाने बहूत व ब्राम्हण व बैरागी व आग्रहारे वगैरे धर्मादाय करून देणे त्यास दोन गांव दिल्हे असतां कसे पुरेल यास्तव तुम्ही पाटीलबावासी बोलून मथुरा व वृंदावन परगणे सुल्द्धा सरकार खालशात करून घ्यावी म्हणजे चांगले तेथे कमावीसदार ठेवणे तो भिकाजीपंताचे तर्फने ठेवावा पा। शाही सनदा आलीयावर घेऊन नकला तुम्ही करून घेऊन असल सनदा येथे पाठऊन द्याव्या रा। छ २४ रमजांन बहूत काय लिहीणे लोभ असो 'दीजे हे विनंती'[1]

---

श्री

(२३-६-८९)

पौ छ १५ सवाल
तिसैन आशाढ मु॥
श्री मथुरा

सहस्त्रायु चिरजीव राजमान्य राजश्री अलीबाहादूर यासी आसिर्वाद उपरी येथील कुशल ता। छ २८ रमजान पावेतो वर्तमान येथास्थित असे विशेष आलीकडे वीस पंचवीस दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी वरचीवर पाठऊन संतोषवीत जावे इकडील वर्तमान पेशजी पत्र पा। आहे त्यात सविस्तर लिहींलें आहे सरकारच्या वोढीमुले रा। हरीकर्ण याचा ऐवज रोक लक्ष साडेबाहातर हजार देणे राहिला आहे ऐवज तो त्याचे पदरी पडत नाही सख्त रदबदली करावी तरी मर्जी तुटेल बोलणें ते मनधरणीचे बोलत आहेत ह्या ऐवजपैकी साडे सत्येचाळीस हजार याची वरात दिल्ही आहे बाकीची वरातही दिल्ही नाही साहकारास वोढ बसली तेव्हा तुमचे तिकडे कसे चालेल येविसी चिता बहूत लागली आहे तरी याचा बदोबस्त राजश्री नानास लिहून करवावा की ऐवज तुम्हास वरची वर पोहचे ऐसे करवावे चिरंजीव प्यारी साहेब व राजश्री दादासाहेब खुशाल आहेत बहूत काय लिहीणे हे आसिर्वाद[2]

---

१ पत्र नाना फडणविसांचें. २ पत्र बहादूरच्या मातुश्रीचे.

अनुक्रमणिका

# लावण्या

( ना. गो. चापेकर )

या लावण्या बदलापूरच्या एका ठाकराकडून घेतल्या आहेत.

## भिंगाची लावणी.

एक वेळा भिंग पाहिला राघो मौजेचा
हिरवा रंग राघोचा चारा आणतो मोत्यांचा
त्या राघोला तहान लागली समुद्रावर गेला
तीन मुखवट्या बुडवून शाहिरा एक घोट केला
एक घोट पिऊन राघोची तहान नाहीं गेली
तीन भिंगांचा चुरान पाहून मनीं दंग झालें ( १ )
दुसऱ्या भिंगांतून पाहिला बेलचंदन
त्या चंदनाला आलीं पानें अवघीं दोन तीन
पहिल्या पानाखालीं गेली सृष्टि झांकून
दुसऱ्या पानावरि ऋषि करतील भोजन
तिसऱ्या पानावरि जळते नित्य आगीन
त्या अग्नीच्या पोटीं जन्मली नागी पद्मीण
डफढोलगी बसा संभाळून जाइल गिळून ( २ )
छपर गण सागर तेथें एक राघोचा घर
राघोच्या शिरिमस्तकीं तळा एक भरलें पाण्यानें
त्या तळयामधीं नित्य जळते आगीन
त्या अग्नीच्या भोवतीं ऋषि देव बैसले नऊजण
एक एकाच्या गळयामधीं नऊ नऊशें कामीण
करा शब्दाचा मान शास्त्रार्थ द्या मला निवडून
चौथ्या भिंगांतून पाहिला असा एक चंदन ( ३ )
त्या चंदनाचा शेंडा गेला आकाश लागून
एक्या खांदीवर घारीनें घरोटाच केला
त्या घारीनें अंडीं घातलीं अवघीं दोन तीन
पहिल्या अंड्यांतून कुठें झाले राम लक्ष्मण
दुसऱ्या अंड्यामधीं कुठें मेरुचा आसन
तिसऱ्या अंड्यामधीं कुठें जळते आगीन ( ४ )

## भिल्लाची लावणी.

सातपुडी डोंगर साजण झाडी काठवण भिल्लाचें रान
कसे जाल वाटेनें भिल्ल मारतील तीरानें मागं आहे कोण
पलटणची वातमी जासुदा सांग वारंवार पुसते नार
सोरि संगती गेले शिपाये नाहिं आले परतून लढे कामीन
देतें बैसाया घोडा घोडा तुम्ही फिरवा मौजेनें घरीं राहून ( १ )
आला सण शिमग्याचा सण शिमगा मी खेळूं कोणा संगें उडवा रंग
मी निजले पलंगावरी जागी मी झाले डचक्यानें लचकली मान
हातीं घेऊन पंचारती ओंवाळितें माझा दिलभर पलंगावर
हातीं घेऊनियां समाचार अगोदर कापा माझी मान जाइल हा प्राण (२)

## वेगळेपणाची लावणी.

चौघाभावांचा ऐका विचार । धाकटी नार निघाली अगोचर ।
तिला मारिलें सासूसासऱ्यानें । तिला अक्कल नाहीं केवळ पाषाण ।
अहो पतिराया कां भरलें वेड । कष्टसंगें चूर झालीं हाडं ।
शेण पाणी करतांनीं मोडली कंबर । द्यो रुपयाचा बांड नेसूं कुठवर ।
निऱ्या पडती गुढघ्याच्यावर । अहो पतिराया कां भरलें वेड कष्ट संगें चूर झालीं हाडं (१)
चार परमेश्वर आणा बोलावून । हा संसार चार ठायीं देवा वांटून ।
सोळा बैल घेतले निवडून । गाई म्हशी आल्या तीन तीन ।
भांडींकुंडीं घेतलीं वांटून । दाण्याचीं पेवीं घेतलीं मापून ।
शेतीभाती घेतली वांटून । नथ डागिना घेतला तोडून ।
अहो पतिराया कां भरलें वेड । कष्टसंगें चूर झालीं हाडं ( २ )
उपट खाली पतीच्या दैवानें । सोळा बैल मेले रोगानें ।
गाई म्हशीचें नाहीं ठिकाण । दाण्याचीं पेंवीं गेलीं सरून ।
नथ डागिना खाल्ला मोडून । भांडीं कुंडीं नेलीं सावकारानें । होती कोंबडी ती खाल्ली खरड्यानें।
अहो पतिराया कां भरलें वेड कष्टसंगें चूर झालीं हाडं ( ३ )

## मरतिकाची लावणी.

थाट करून माट नेसली चंद्रकरकाळी, कोण हौशाची राजबाळी,
आसकीच्या नादानं बुडाल्या शहाण्णव कुळी तेव्हां लंकेची झाली होळी
भगलेपणाच्या गोष्टी सांगतो नव्ह कीरे केली, मी एक आतमाया भोळी
कर शब्दाचा मान्या घेतों तुला जरकांठ चोळी, मिळूं दे गुळवण्याला पोळी ( १ )
**ऐक पंडिता तुला सांगतों व्यर्थ नरदेवी, मायेचा पसारा, जगामधीं आपला कोणी नाहीं.**

लखपति सावकार ह्याची केवढीग बढाई; संपत्तीचा धनी हरपला, मग रडते माई
असेल घरामधीं धन दौलत ती करावी कायी, सन् संपदा असून वरोबर कवडी गेली नाहीं
असतील काक्या, असतील चुलत्या म्हणायला बाई आली यमाची उडी
मग कुणी सोडवत नाहीं.
ओठावरती किरणकमाया शोभते ग बाई बापासारखा धनी शेवटीं कामा येत नाहीं.
चुलती म्हणते चोळी कांकण हरपलें बाई, बायको म्हणते शेज भागला पडले दुराई (२)
सवा हात रे कापड आणाया पेठमधीं जाई
कोणी खणितो खाच उठली कामाची घाई
तिरड्यावरतीं हात बांधले आतां करूं काई
खाटल्यावरती ह्याला घातलें रडायाची घाई
शेज बाजूला चार भावली चौघे झाले बोडके
होता पोटचा लेकरुं त्यानीं घेतलें शिदोरीचें मडकें
नगिनी यावें नगिनी जावें वरतीं लवलाही
आतमरगी[1] गेला वरती कोणाची ओळख नाहीं
एक देहीला नव दरवाजे करावी चतुराइ
कोणच्या देहीवाटे आत्मा गेला झाले लवलाही
चुलीवरती भात ठेवला खालीं जाळ नाहीं
थोडथोडं पाणी घातलं कुठ शिजला नाहीं
ह्या देहीचा मोतुरपाया कोणि रचलाही
सांग भटाचें नांव पायामधिं काय घातलाही (३)

---

## धवशा

असा एक मी धवशा पाहिला धवशाला चार तोंड
हमेसाशी लावून सडका उडतील कोरडे
लाही उल्लाव लहान गिळली, गिळली नवखंडें
मुलखामंधीं धुंद मांडली वैऱ्याला दंड
आच्छार मच्छार माया मंडळ सुमार घर याचा
निर्गुणाच्या पलीकडे रहिवास त्याचा
धवशा शास्तर टोला भेरीका संभाळ शास्त्राचा
नुंगेसुरते पद घ्या ऐकून टोला हरीपाचा. (१)
जुग्म जुग्मी मी एक पाहिली रणांत नागीण
तिची पडली फरपट त्यांत बुडालं तिरभुवन
अशी पंडिता नागीण धुंडून आणिली कुडून

---

१ आत्मा

जर का म्हणशील सात समुद्र जाईल पिऊन
खारट खाईना तुरट खाईना हरामरुताचा
धवशा शास्तर टोला भेरीका संभाळ शास्त्राचा
लुंगे सुरते पद घ्या ऐकून टोला हरिपाचा (२)
एक्या पुरुषाला हजार शिष्ण होती सर्व अंगीं
कोणत्या शिष्णानीं अस्तुरी भोगावी लावावी मार्गीं
एक्या शिष्णामधीं धडीचे पुत्र पांचजण
करा वेळीची बेरीज तुम्ही राव चढवा गावण
बारा बिरदना कशी चढविता करार कलगीचा
धवशा शास्तर टोला भेरीका संभाळ शास्त्राचा (३)

## जगाची उत्पत्ति.

ऐक पंडिता तुला सांगतों शास्त्र कुळ धरून
जळांतुन आला बुडबुडा घ्या तुम्हीं ऐकून
बुडबुड्याच्या मोरं पंडिता उभें होतें कोणं
आधीं दिव्य सांगून मग पुढें करा गाणं
नाभीं कमळ झळके नाभीला करणार कोण
नाभीं कमळ कुठें जनमलें दे मला सांगून
नाभीं कमळणीच्या फुलांत जाऊन बैसले भगवान
नाभीं कमळण कोणीरे केलें पुरुष होता कोण ? (१)
अठरा पल्याच्या पल्यावर भगवान जळावर होते
आनंद रूपाची झोप तयाला भगवान निजलेते
झोप पुरी जाहल्यावर महाराज उठून बसलेते
गोष्ट आली त्यांच्या मनांत.
भगवंतानीं विचार करुनि आपल्या मनांत
आसती ह्या वेळेला नार भोगीन मनोरथ
हात जोडुन उभी राहिली मोरं शकत
या तिजला भोग आतां पुरवा मनोरथ
भोग दिला कीं नाहीं दिला सांगा पंडित
आईस लागे कीं बहीण लागे सांग शिव शक्तीचें नात. (२)
ब्रह्मदेवांनीं घेउन लेखणी आपल्या हातांत;
खेळ मांडिले तिन्ही ताळांत
ब्रह्माविष्णुमहेश तीन देव पुढें झालेत
तिघांजणांना तीन तीन कामें काय दिलीं तीनही ताळांत

शुन्य शुन्य मायाचा घर ऐका पंडित
तुम्ही शिव पंडित ओळख धरा एक्या अक्षरांत ( ३ )
कोटी कोटी यवदना नव्हती सूर्याला ज्योत
जांबुवंताचा बाप सांगा तुम्ही अशा यवगांत
सटुपिलाजी गुरु गेनाजी हुर घाला ज्योत
माणिक देशामधीं गांव करंगळी निशाण भडकत
ऐसें कैसें म्हणेल रे भाऊ घरावें ध्यानांत
गेनु बळवंता म्हणे वैरी आगिवाणी जळत्यात. ( ४ )

---

## पांडवांची लावणी.

पांची पांडवांची सभा बसली, धर्मराज थोर
सहदेव पोथी वाची समोर
अर्जून खेतरी धनुष्यबाण घेऊन संचार
गदा भीमाच्या खांद्यावर ठायीं ठायीं पांडव
रक्षिले भक्तीच्या आधारीं, यांचे कैवारी सारंगधर
द्वारकेमधीं कृष्णदेव तो एक परमेश्वर,
द्रौपदीला पुरविलीं वस्त्रें; हात जोडूनि मी
आर्जव करतों कुंती द्रोपदीला
खिनभर—करूं नको गलवला ( १ )
देसाई देशमूख पांडे जमादार कचेरी
भरली देव दरबारीं
अवघे रयीत मिळून पाहयाला जातील लहान थोर
समाकुलभारी पांढरीवर; येतील आया जातील—बाया,
त्याच्या समस्ताला; खिनभर करूं नको गलवला ( २ )
हात जोडून मी आर्जव करतों आणखी मुक्ताबाईला, वेताळ राखण पांढरीला
तुज उजळा, पाहून पहिला, मान देतों तुला, संभाळून तेल घाल दिवटीला
गांवाचा कोतवाला, त्यांनीं गांव मजकूर केला, चौकया चार रस्त्याला.
गांवामधीं दिवाणवाडा, घेडवाडा बाहेर, हमेशा उभा चावडीवर ( ३ )
हात जोडून मी आर्जव करतों माझ्या गुरुस्वामीला, यांनीं मला आज्ञा मार्ग दाविला,
आम्हीं गाण्याशीं उभे राहतों; भितों आमच्या जिवा, गाण्यामधीं गर्व नसावा,
मनामधीं इसमिस होती संचिताचा ठेवा, आला वाटा कुणाला यावा.
काय बेट्याचा गळा चांगला काय नाच्याचा जवा, असा लवंडिचा गाणारा असावा
( ४ )

---

अनुक्रमणिका

## वेळू व चंदन

भांडतील दोघे जण वेळूचंदन; तुम्हीं ऐका चित्त देऊन;
वेळू म्हणे चंदनाला ऐक तूं मूढा, माझा होतो धनुषमेढा;
पालखीला होत्यात दांड्या आणखी जीन कोढे; पायीं फौज चाले धुडधुडे;
माझ्या काठ्या लागल्या शिखराला; आणखी मोहरी पांवा;
वाजवी शिरेहरी[1] का नारायण चल तुला पुसतो कोण. (१)
चंदन म्हणे वेळुला ऐक नीच जाती; मांगाच्या घरीं तुझी वस्ती
गाईढोराच्या सांगळें[2] तुला आवडती; आणखी शिंतोडा घेतीं दुरदुर होई अमंगळा;
माला तुझा येतो कंटाळा; चंदनाच्या होत्यात माळा,
घालत्यात गळा कीं नारायण; चल तुला पुसतो कोण. (२)
वेळु म्हणे चंदनाला ऐक तूं वेड्या माझ्या होत्यात कामोड्या,
होत्यात सुपल्या आणखी कुरकुल्या दुरड्या वळचणी लावल्या चाड्या;
बळीराज लावतो शेत, नाहीं माझ्या वाचून चालत, भाला आहेत लष्करांत,
हत्तीवर तक्त निशाण नाहीं चाले सुपावाचून.
भांडतील दोघेजण वेळूचंदन ऐका चित्त देऊन. (३)
पेमतीर गोसावी गातो गरंथ[3] संन्याशी केंगरांथ, दोघाशीं धरली जोड्याशीं
विठू रामू सरग्यानीं वेळूची होते पाटी शेण भर चल तुला पुसतो कोण. (४)

---

## कथा.

(ना. गो. चापेकर.)

पुढें दिलेली कथा बदलापुरच्या एका कातकऱ्यानें सांगितली. ही कथा तो पांचवीच्या दिवशीं सांगतो.

एक आंबरसर राजा होता. त्याला आंबरसया नांवाची मुलगी होती. तिचें आंवऋषीबरोबर लग्न झालें. लग्न होऊन बारा वर्षें झालीं; पण पोटीं संतान होईना तेव्हां ती आपल्या पतीला बोलली कीं पुत्र संतान नसल्यामुळें राज्याला कोणी वारस नाहीं. तेव्हां तूं दुसरें लग्न कर. पण आंबऋषीनें आपल्या भार्येला सांगितलें कीं तूं असतांना मी दुसरी बायको करणार नाहीं, मग आपल्या नशिबांत काय असेल तें खरें. त्यावर आंबरसयेनें उत्तर दिलें कीं राज्याला कोणी धनी नसल्यामुळें मी आत्महत्या करून तुला दुसरें लग्न करावयास लाविलें असतें; पण तसें केलें असतां नरकवास सोसावा लागेल अशी मला भीति वाटते; म्हणून ज्यांनीं मला जन्म दिला त्यांच्याकडे जाऊन त्यांची मी सेवा करीन. सेवा करतांना मरण आलें तर मला सद्गती मिळेल. ह्यावर तिच्या पतीनें तिला पुनः बजावलें कीं तूं देवाकडे गेलीस तरी सुद्धां मी दुसरें लग्न करणार

१ श्री. २ मांस. ३ ग्रंथ.

नाहीं. तेव्हां आंवरसया आंवऋषीच्या पायां पडून म्हणाली, तूं माझी आतां आशा सोडें. मी आलें तर तुझी; मेलें तर पृथ्वीची. आंवऋषीनें तिला जाण्यास अनुज्ञा दिली. आंवरसया एकवीस स्वर्गास लागून कैलासास पोंचली आणि शंकराच्या चरणापाशीं आली. तेव्हां शंकरानें तिला विचारलें, तुझ्यावर एवढें संकट तरी कोणतें आलें आहे म्हणून तं माझे पाय धरलेस ? आंवरसया म्हणाली, जन्म देऊन वाया चालला, पोटीं नाहीं आणि पाठीं नाहीं अशी स्थिति आहे. शंकर म्हणाला कीं बाई, ब्रह्मदेवाचा टांक आणि सतीचें अक्षर हें कांहीं चुकत नाहीं. तेव्हां आंवरसया त्याला म्हणाली तर मग माझ्या पोटीं पुत्रफळ द्यावें. शंकरानें सांगितलें तुझ्या दैवांत पुत्र नाहीं. तेव्हां आंवरसया त्याला म्हणाली कीं मला येथेंच मृत्यु आण. शंकरानें सांगितलें तुझें आयुष्य पुष्कळ असल्यामुळें तुला मृत्यु येणार नाहीं. तूं ब्रह्मलोकीं गेलीस तरी तुला हेंच उत्तर मिळेल. म्हणून तूं परत मृत्यूलोकीं आपल्या राज्यावर जा. तुला मरण नाहीं. तेव्हां आंवरसया पुन: एकवीस स्वर्गास लागली आणि मृत्यु लोकीं येऊन राज्यावर वसली. इतक्यांत पार्वतीला तिची दया येऊन तिनें महादेवाला विनंती केली कीं आपण नवखंड पृथ्वी आणि दहावी काशी हिंडणारे आहांत. कांहीं तरी करा आणि आंबरसयेला पुत्रफळ द्या. असें करतां येणार नाहीं असें महादेवानें म्हटल्यावर पार्वती त्याला पुन: म्हणाली, तूं वाटेल तें कर पण आंवरसयेच्या 'देहीं उजेड कर.' मग शंकरानें विचार करून नारद देवाचा शोध केला. त्यावेळीं नारद तिन्ही ताळा सप्त पाताळा क्षीर सागरांत होता. तेथें त्याला बोलाविणें पोंचतांच तो एकदम निघाला आणि कैलासास आला. महादेवाला नमस्कार करून मला कां बोलावणें केलें म्हणून त्यानें पृच्छा केली. महादेव म्हणाले थोडें काम आहे. करशील का ? नारद म्हणाले करण्यासारखें असेल तर करीन, नाहींतर सोडून देईन; पण मला सांगा. महादेवानें नारदाला सांगितलें. अंगांत भगवें वस्त्र घाल डोकीला टोपी घाल, तोंडाला भस्म लाव, खांद्यावर विणा धर आणि एका हातांत टाळ घे. अशा थाटानें आंबऋषीच्या नगराला जा. तेथें दोन अक्षरें सांग. तोळा भरून गांजा देईल त्याला एक पुत्र होईल. दोन तोळे देईल त्याला दोन होतील. ह्या शिवाय तिसरें अक्षर बोलूं नको. त्याप्रमाणें नारददेव आंवऋषीच्या नगराला जाऊन सर्वत्र हिंडले. नंतर राजवाड्यांत गेले. प्रधानानें पाहून राजाला कळविलें कीं आपल्या नगरांत जोशी आला आहे. तो असें बोलतो कीं एक तोळा गांजा देईल त्याला एक बाळ होईल. दोन तोळे देईल त्याला दोन होतील. मग राजाच्या सांगण्यावरून प्रधानानें नारदाला राजाजवळ आणलें. मग आंबऋषीनें प्रधानाला सांगितलें. एक टोपली गांजा व एक टोपली अफू आणून साधूच्या पुढें ठेव. गांजा अफूची टोपली पुढें आल्यावर नारदानें धोपटींतून एक तराजू व दोन तोळयांचें वजन काढलें. नंतर दोन तोळे गांजा जोखून घेतला व बाकीचा परत दिला. मग एक तोळा गांजा मळून ओढला. नंतर नारददेव कैलासास जाऊन शंकराला भेटले आणि म्हणाले माझा वांटा मी ओढला तुझा तोळाभर गांजा तूं घे. महादेवानें नारदाला गांजा मळून चिलीम भरण्यास सांगितलें आणि म्हटलें तोळाभर गांजा आपण दोघे ओढूं. त्याप्रमाणें दोघांनीं गांजा ओढल्यावर नारददेव क्षीरसागराला गेले. नंतर कांहीं काळ गेल्यावर आंबरसया गर्भार राहिली. नऊ महिने नऊ दिवस भरले; प्रसूत होऊन दोन पुत्र झाले. स्वर्गांत घंटा वाजूं लागल्या कीं आंबरसयेच्या दैवांत पुत्र नव्हता, मग हे पुत्र कोणी दिले ? तेव्हां ब्रह्माविष्णूंनीं विचार केला कीं ज्यांनीं ह्या बाळांना जन्म दिला तोच त्यांचीं नांवें ठेवील. पुढें बाराव्या दिवशीं मुलांना पाळण्यांत घातलें

तेव्हां नारदांनीं भिक्षुकाचें रूप घेऊन ते आंबऋषीच्या नगराला गेले आणि दक्षिणा मागूं लागले. हा आरास कसला चालला आहे अशी नारदांनीं चौकशी करतां मुलांचें बारसें असल्यानें गाणें चाललें आहे असें समजलें. मुलांचें तुम्हीं नांव ठेवा. पंचांग आणतों मग नांव ठेवतों असें नारदानें कळविलें. असें म्हणून नारद महादेवाला आणा-वयाला गेले. महादेवानीं पोटदुखीचें निमित्त सांगितलें. त्यांना वाटलें कीं मी नांव ठेवीन तर माझें नांव 'दाखील' होईल. नारद म्हणाले कसेंही करा पण चला. महा-देव म्हणाले मला दवा आणून दे. मृत्युलोकीं जा आणि जिवंत असेल त्याला फाडून त्याचें काळीज आण हा दवा मला लागू पडेल. मग नारद मृत्युलोकीं जायला निघाले. त्यांना वाटेंत गाय भेटली, तिनें विचारलें अरे देवा, जातोस कुठें? नारदानें सांगितलें शंकर-देवांचें पोट दुखत आहे म्हणून त्यांना दवा आणायला जातों. गाईनें विचारलें दवा कोणता? नारद म्हणाला ही सोन्याची सुरी घे, तूं आपलें पोट फाड आणि काळीज आणून दे. गाय म्हणाली देवा, उद्यांचें मरण आज कोण पतकरील? हे चैत्र वैशाखाचे दिवस आम्हीं मोठ्या जुलमानें काढतों. तेव्हां माझ्याजवळ दवा नाहीं. तुला दुसऱ्या कोठें मिळेल तर घेऊन ये. नंतर नारददेव सगळया पृथ्वीवर हिंडले पण त्यांना कोणी दवा देईना. मग ते जपन देशाला गेले. त्यावेळीं जपनऋषी शंकराचा जप जपत होता. बारा वर्षे त्याचा जप चालला होता. तो पुरा व्हायला आणि नारददेव जायला एकच गांठ पडली. तूं कोठें चाललास असा प्रश्न जपन ऋषीनीं विचारल्यावर शंकराचें पोट दुखत आहे त्याला दवा आणण्यासाठीं जातों असें नारदानीं उत्तर दिलें. कोणता दवा पाहिजे हें नारदानीं सांगितल्यावर जपनऋषीनीं सोन्याची सुरी घेऊन आपलें पोट फोडलें व काळीज 'आठीडील' दिलें. कारण त्यानें विचार केला कीं मीं बारा वर्षे तप केलें तेव्हां शंकराचा भक्त झालों. त्याचें ज्या अर्थीं पोट दुखत आहे त्या अर्थी त्याला दवा दिला पाहिजे. नारदानीं हा दवा नेऊन शंकराला दिला व त्याचें पोट राहिलें. आणलेला दवा शंकरानें खुंटीला लावून ठेवला. नंतर नारदानीं आंबरसयेच्या पुत्राचें नांव ठेवा-यला जाण्याविषयीं शंकराला पुनः विनंति केली. तेव्हां शंकर म्हणाले कीं तुझ्या माझ्या सारख्याला नांव ठेवतां येणार नाहीं. ज्यांनीं पोट चिरून आंतडें दिलें तोच नांव ठेवील, म्हणून जपनऋषीला घेऊन जा. म्हणून नारद जपन देशाला जाऊन त्या जपन ऋषीला घेऊन आंबऋषीच्या नगराला गेला व त्या मुलाचें नामकरण केलें. एकाचें नांव पालकदेव आणि दुसऱ्याचें गोपाळदेव अशीं नांवें ठेवून ते दोघे परतले. इकडे आठ दिवसांनीं खुंटीवर टांगून ठेवलेल्या काळजाला वाचा फुटली. तें म्हणूं लागलें देवा, मला कांहीं तरी वर दिला पाहिजे. त्यामुळें शंकर तें जपन ऋषीचें काळीज घेऊन ढवळया नंदीवर बसून चौथ्या समुद्राला जावयास निघाले. तेथें गेल्यावर समुद्राच्या मध्यभागीं त्यानीं तें काळीज टाकलें. तें अगदीं तळाला गेलें. नंतर देठ होता तो वाळूंत खुपसला. तेव्हां त्या काळजाच्या वरतीं कमळ उत्पन्न झालें. मग शंकरानीं त्याला वर दिला कीं वाटेल त्या देवाच्या मस्तकावर तुला नेऊन वाहतील.



# सवाशीण

( ले.–ना. गो. चापेकर. )

सवाशणीला सवाष्ण हा एक प्रतिशब्द कोशांत दिलेला आढळतो. दोन्ही शब्द स्त्रीलिंगी आहेत.

ब्राह्मण सांगतात त्याप्रमाणेंच सवाशणी सांगतात. सवाशणी या स्त्रीब्राह्मण होत. मेहुणांत ज्या पुरुषास आमंत्रण दिलें असेल त्याचीच पत्नी बोलवावी लागते. पण ब्राह्मण सवाशीण सांगावयाची झाली तर त्या दोघांत पतिपत्नीसंबंधाची आवश्यकता नाहीं. ब्राह्मण सांगण्याचा रिवाज ब्राह्मणजातींत फार आहे. इतर जातींत हें अर्थातच शक्य नाहीं. म्हणजे जन्मसिद्ध ब्राह्मण ब्राह्मणेतरांकडे जेवणार नाहीं. ब्राह्मण किंवा सवाशीण सांगणें म्हणजे त्यांस भोजनानें संतृप्त करणें होय. ब्राह्मणाकडून पाकनिष्पत्ति करवून ब्राह्मणेतर ब्राह्मणभोजन घालतात. पण एखादुसरा ब्राह्मण घालावयाचा असेल तर ही दगदग वारंवार करीत राहणें जमत नाहीं. तथापि सवाशीण सांगण्याची वहिवाट ब्राह्मणेतरांत फार; ब्राह्मणांतल्यापेक्षांहि अधिक; सवाशीण ब्राह्मण जातीची पाहिजे असें नाहीं. आपल्या जातीची चालते. मग " ब्राह्मण " तरी आपल्या जातीचा कां चालूं नये, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कातकरी व महार जातींत ब्राह्मणाचा शिरकाव नाहीं. ते लग्नकार्य आपआपल्या जातीच्या भटांकडूनच उरकून घेतात. तेव्हां अशा जातींत कातकरी अथवा महार ब्राह्मण सांगण्याची चाल पडली नाहीं. तथापि कातकरी, ठाकूर वगैरे झाडून सर्व जातींत सवाशीण सांगतातच. देवींच्या साथींत अथवा नवरात्रांत सवाशणी जेवूं घालाव्या लागतात. आपल्या जातीची सवाशीण मिळाली नाहीं तर दुसऱ्या जातीचीहि सवाशीण सांगण्याची वहिवाट ब्राह्मणेतरांत आहे. न्हावी, आग्री जातीची सवाशीण सांगतो. तिची ओटी भरून शिधा देतो. कारण आग्री न्हाव्याकडे जेवीत नाहींत. पण ब्राह्मण बोलावून त्याला शिधा देण्याची चाल सध्यां कमी प्रमाणांत आहे. याचें कारण ब्राह्मण ज्यांत अविकल्पेंकरून सांगावा लागतो असे प्रसंगच ब्राह्मणेतरांत येत नसावेत. तथापि ब्राह्मण जातीच्या बायकोला सवाशीण सांगून शिधा देण्याचा प्रघात कां पडला नाहीं हाहि मनन करण्यासारखा विषय आहे.

कुणबी, माळी, ठाकूर, कातकरी, महार, चांभार, बेलदार या सर्वांत सवाशणी सांगतात. एका हपसाणी जातीच्या माणसानें असें सांगितलें कीं त्याच्या जातींत कोरी म्हणजे नहाण न आलेली विवाहित मुलगी सवाशीण म्हणून पसंत करतात. ती नच मिळेल तर "ओली" सवाशीण सांगतात. बदलापुरांत शिंपी लोकांत कुंभार जातीची सवाशीण सांगतात. तिची ओटी भरून तिला भोजन घालतात. शिंपीवाण्यांना कोणत्याहि कुणबी जातीची सवाशीण चालते. बदलापुरांतील गुरव जातींत स्वजातीची सवाशीण न मिळाल्यास कुंभाराची अगर इतर कुणबी जातीची सवाशीण भोजनास बोलावतात. कायस्थांत ( बदलापुरांतील ) आपल्या जातीची सुवासिनी न मिळाल्यास दैवज्ञ जातीची बायको सांगतात.

ज्या जातींत पाट लागतो त्या जातीची सवाशीण आम्हीं सांगत नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. दैवज्ञ कायस्थांकडे जेवीत नसल्यामुळें ही कोरडी सवाशीण सांगणेंच भाग पडतें. कोरडी सवाशीण म्हणजे नुसती ओटी भरून कुंकू लावून तिची बोळवण करतात ती. कांहीं ब्राह्मणांत उ० देशस्थांत कुणबीण सवाशीण सांगण्याचा कुलाचार आढळतो. असाच कुलाचार कोकणांत कांहीं कोकणस्थांकडे असल्याचें समजतें.

मूल जगत नसलें तर सटवाईला नवस करतात; तेव्हां ब्राह्मणांतहि शूद्र स्त्री सवाशीण सांगण्याचा विशेष प्रघात आहे. चित्पावनांत बोडणाला चित्पावनच सवाशणी लागतात. देशस्थ अथवा कऱ्हाडे या जातीच्या चालत नाहींत. असें ऐकण्यांत आहे कीं कांहीं ब्राह्मणांचा कुलाचार विधवापूजनाचा आहे. यांना "विधवा सुवासिनी" म्हणतां येईल. विठ्ठलसवाशणी म्हणतातच. विठ्ठल आहे नवरा जिचा ती विठ्ठल सवाशीण. विधवाकुलाचाराबद्दल विशेष माहिती कोणी दिल्यास फार उपकार होतील. विधवांना न्हाऊं घालतात हा शाक्तधर्म असावा. तथापि सवाशीण सांगण्याची वहिवाट सर्व जातींत आहे त्याअर्थी देवीची उपासना सुरू होण्याच्या अगोदरपासून ही चाल आहे कीं काय याचा विचार होणें अवश्य आहे. सवाशीण प्रायः देवीच्या निमित्तानेंच सांगण्याची रीत आहे. पण देवींकरतां कुमारी म्हणजे कोवारणी व लग्नादिप्रसंगीं सवाशणी असाहि भेद पाळलेला कित्येक ठिकाणीं आढळतो. या बाजूला कातकऱ्यांत लग्नाच्या सवाशणी सांगत नाहींत. फक्त देवींच्या सांगतात. त्या सर्व आठवर म्हणजे कुमारीच असतात. तथापि त्यांना कोवारणी न म्हणतां सवाशणी म्हणतात हें विशेष आहे. इतर जातींत विवाहसमारंभांत गौरीहरानिमित्त सवाशणी भोजनास बोलावण्याचा परिपाठ आहे. या सवाशणी विवाहित असतात. धर्मसिंधूंत या प्रसंगीं ब्राह्मण-सुवासिनीभोजन सांगितलें असून ब्राह्मण जातींत हें अनुशासन कोणीच पाळीत नाहीं याचें कारण काय असावें बरें ?

सुवासिनी मृत झाली असतां तिच्या श्राद्धाला सवाशीण सांगण्याची चाल पडली आहे. पण ही असमंजसपणाची असावी. मेल्यानंतर लिंगभेद नाहीं. पितृस्थानीं ब्राह्मणच पाहिजेत. सुवासिनीला श्राद्धकर्मांत स्थानच नाहीं. सर्व कर्म आटोपल्यावर तिला अमंत्रक दक्षिणा देण्यांत येते. एतद्विषयक मार्कंडे याचें वचन मुळींच महत्त्वाचें वाटत नाहीं. "तस्याः स्थाने नियुञ्जीत विप्रैः सह सुवासिनीम्" असें मार्कंडेयवचन धर्मसिंधूंत दिलें आहे. पण हें असमंजसपणानें पडलेल्या चालीचें धर्मीकरण होय असा संशय येतो. कांहीं मराठा जातींत विधवा स्त्रीच्या मृत्युदिनीं विधवाच सवाशीण सांगण्याची चाल आहे असें समजतें.

ब्राह्मणेतर सर्व जातींत वास्तुशांतीच्या दिवशीं मात्र ब्राह्मण जातीचीच सवाशीण बोलावण्याचा प्रघात आहे. चुलीवर प्रथम ब्राह्मणानें अन्न शिजवून भोजन केल्यावांचून त्याच चुलीवर ते आपला स्वयंपाक करीत नाहींत. कांहीं कारणामुळें त्या दिवशीं ब्राह्मण नच मिळेल तर आग्नेय दिशेस घातलेल्या चुलीवर ते लोक आपलें अन्न शिजवीत नाहींत. निराळी चूल घालून ब्राह्मणभोजन होईपर्यंत तिच्यावर स्वयंपाक करतात. वास्तुशांतीच्या दिवशीं ब्राह्मण जातीच्या सवाशणीबरोबर आपल्या जातीच्याहि सवाशणी सांगतात.

जेव्हां नैमित्तिक एखादा ब्राह्मण सांगावयाचा असेल तेव्हां त्याला ब्राह्मणेतरांकडून शिधा देण्यांत येतो. दशमीद्वादशीचा शिधा वृत्त्यंशी ब्राह्मणांस देण्याची वहिवाट आतांपर्यंत होती.

देवीभागवतांत निरनिराळया वर्णाच्या कुमारिकापूजनाचें फळ सांगितलें आहे तें असें. ब्राह्मणी सर्वकार्येषु जयार्थे नृपवंशजा। लाभार्थे वैश्यवंशोत्था मता वा शूद्रवंशजा ॥ ( ३–२७–५ ). अर्थः ब्राह्मणी कन्या सर्व कार्यांना उक्त असून जयाकरतां क्षत्रियकन्येचें पूजन करावें आणि लाभाकरतां वैश्यकन्येचें अथवा शूद्रकन्येचें पूजन करावें. कांहीं झालें तरी दहा वर्षाच्या पलीकडे गेलेली कन्या पूजनाला योग्य नाहीं. " नववर्षाभवेद्दुर्गा सुभद्रा दशवार्षिकी । अत ऊर्ध्वं न कर्तव्या सर्वकार्यविगर्हिता " ( ३–२६–४३ ). कुमारीपूजनाचा मन्त्र धर्मसिंधूंत दिला आहे तो असाः– जगत्पूज्ये जगद्वंद्ये सर्वशक्तिस्वरूपिणि । पूजां गृहाण कौमारि जगन्मातर्नमोस्तु ते ॥ ह्या मंत्रानें पादक्षालनपूर्वकगंधधूपदीपभोजनानें कुमारीचें पूजन करावें.

नवरात्रांत कुमारिकांचें पूजन सांगितलें असून कुणब्यांत व इतर जातींतहि विवाहित मुलीच सवाशणी सांगतात. ह्या कोवारणी कशा असाव्या याविषयीं देवीभागवतांत आढळतें तें असें:–अरोगिणीं सुरूपाङ्गीं सुंदरीं व्रणवर्जितां । एकवंशसमुद्भूतां कन्यां सम्यक् प्रपूजयेत् ( ३–२७–४ ).

सवाशीण या शब्दाची व्युत्पत्ति विविध रीतीनें दिली आहे.

रुद्र– स्ववासिन्यां चिरिण्टी स्याद्वितीयवयसि स्त्रियाम्; चिरिण्टी तु सुवासिनी.

चिरण्टी किंवा चिरिण्टी अशा दोन्ही रीतीनें हा शब्द लिहितात.

चिरिण्टी, सुवासिनी द्वे प्राप्तयौवनायाः पितृगेहस्थायाः ( रामाश्रमी )

यौवनदशेप्रत पोंचलेली व बापाच्या घरीं राहणारी अशा स्त्रीला चिरिण्टी व सुवासिनी हे शब्द योजतात असें टीकाकार म्हणतो.

वाचस्पति= चिरिण्ट्यां चिरं पितृकुलवासिन्यां स्त्रियां– चिरेण अटति पितृगेहाद्भर्तृगेहं– यौवनवत्यां पितृगेहस्थायां । स्ववासिनी स्वस्मिन् पित्रालये वसति– चिरं पितृगेहादिवासिन्यां– ऊढायामनूढायामपि

बापाच्या घरीं रहाणारी, नवऱ्याकडे क्वचित् जाणारी, तरुण झालेली–विवाहित अथवा अविवाहित अशा स्त्रीला चिरिण्टी म्हणतात. आणि चिरिण्टी म्हणजेच सुवासिनी.

परंतु महेश्वर म्हणतो विवाहित स्त्रीलाच चिरंटी किंवा सुवासिनी म्हणतात. "द्वे परिणीतायां कन्यायां"

पतीजवळ रहाणाऱ्या स्त्रीला सुवासिनी म्हणतात असें सांगणारा एक जैन काय तो आहे.

पतिसमीपे सुष्ठु वसति इति सुवासिनी, सभर्तृका.

शब्दकल्पद्रुम- सुखेन वसतीति सुवासिनी इति द्राविडाः–

सुवासिनी शब्द प्रयोगग्रंथांत आढळतो अग्न्यगारांतून सुवासिनीनें आग्न आणावा असें आहे.

विवाहादि संस्कारांत सुवासिनीनें ओवाळावयाचें असतें. "सुवासिनीभिः नीराजनं कारयेत्. " अशा प्रसंगीं फार करून माहेरवाशणीच पुढें येतात.

बापाच्या घरीं राहणारी अशी जी स्त्री तिला सुवासिनी म्हणतात.

नन्दनटीकाकार सुवासिनीः स्वसॄः असें म्हणतो.

स्मृतिकारहि सुवासिनी शब्द वापरतात· उ.

सुवासिनीः कुमारीश्च रोगिणो गर्भिणीः स्त्रियः।
अतिथिभ्योऽग्र एवैतान्भोजयेदविचारयन्॥
( मनु अ. ३ श्लो. ११४ )

अतिथींच्याहि अगोदर सुवासिनी, कुमारी, रोगी, गर्भार बायका यांना जेऊं घालावें असा वरील श्लोकाचा अर्थ आहे. ह्या ठिकाणीं कुमारी शब्दाचा प्रतियोगी म्हणून सुवासिनी शब्द असावा असें उघड दिसतें; व त्याप्रमाणें नुकतेंच लग्न झालेल्या मुली व सुना असा अर्थ कित्येक टीकाकारांनीं केला आहे. "सुवासिन्यो वध्वो नवोढास्त्रियः स्नुषा दुहितरश्च" (मेधातिथि, कुल्लूक व राघवानन्द). तथापि मेधातिथि आणखी म्हणतोः "अन्ये तु जीवच्छ्वशुरा जीवत्पितृकाश्च प्रसूता अपि सुवासिन्य उच्यन्ते इत्याहुः" (कित्येक लोक ज्यांचे सासरे व वडील जिवंत आहेत अशा मुलें झालेल्या स्त्रियांनासुद्धां सुवासिनी म्हणतात). वरील श्लोकांतील सुवासिनी शब्दाचा सर्वज्ञनारायणानीं दिलेला अर्थ असाः— स्ववासिनी दत्ता वा स्त्री पितृगृहस्था स्वेषु ज्ञातिषु वसतीति. कुमारीः पञ्चवर्षन्यूनाः पांचवर्षांच्या आंतील मुलीला कुमारी म्हणतात. त्याच्या पुढील वयाची अथवा लग्न झालेली पण पितृगृहीं राहणारी ती सुवासिनी.

याप्रमाणें टीकाकारांनीं सुवासिनी शब्दाची नानाप्रकारांनीं व्युत्पत्ति दिली आहे: लग्न झालेली, न झालेली, मूल झालेली, न झालेली, बापाच्या घरीं राहणारी, नवऱ्याच्या घरीं राहणारी इत्यादि; तथापि सुवासिनी व स्ववासिनी हे एकार्थी शब्द आहेत यांत संशय नाहीं. कारण याज्ञवल्क्यानें सुवासिनीच्या जागीं स्ववासिनीच शब्द योजला आहे. (बालस्ववासिनीवृद्ध-गर्भिण्यातुरकन्यकाः). तसेंच महेश्वरी टीकेवरून असें दिसतें कीं अमरकोशांतील सुवासिनी शब्दाचा पाठभेद स्ववासिनी असा कित्येक पोथ्यांत आहे. ( स्ववासिनी इत्यपि पाठः ) शिवाय महेश्वरानें स्ववासिनी याचा केलेला विग्रहहि विचार करण्यासारखा आहे. तो म्हणतोः "तत्र स्वेषु पित्रादिषु वस्तुं शील मस्या इति विग्रहः": आईबापांच्या घरीं राहण्याची जिला हौस ती सुवासिनी.

यावरून असा तर्क करतां येण्यासारखा आहे कीं मातृमूलक गृहसंस्था ज्या कालीं अस्तित्वांत होती तेव्हां सुवासिनी—स्ववासिनी, कुटुंबाची मालकीण—यजमानीण—हा शब्द प्रचारांत आला व त्यावेळीं तो अन्वर्थकहि होता. टीकाकारांनीं दिलेली व्युत्पत्ति अगदींच निर्मूल नसावी. तथापि हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या भागांत सवाशीण सांगण्याची चाल कशी आहे हें समजल्याशिवाय निश्चित मत देतां येणें अशक्य आहे; म्हणून महाराष्ट्री-येतर समाजांत रहाणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं या निर्णयाच्या कामीं सहाय्यभूत होणाऱ्या अन्यसमाजांच्या चाली लिहून कळवाव्या अशी त्यांस हात जोडून विनंति आहे. सध्यां एवढें खचित दिसतें कीं सुवासिनी शब्दाचा अर्थ देतांना टीकाकार किंवा कोशकार यांची बरीच धांदल उडाली आहे.

---

## लिंबन्हाण.

( लेखकः—ना. गो. चापेकर. )

मुलगा लग्नाला जाण्यास निघण्यापूर्वी त्याच्याच मांडवांत त्याच्या आजीला (बापाची आई ) न्हाऊं घालण्याचा रिवाज आहे. तांदुळाच्या पिठाच्या लहान गोळ्या वऱ्याचशा करतात. आजी स्नानाला मांडवांत पाटावर बसली कीं तिच्या डोक्यावर पितळी उपडी धरतात. मग या पितळीवर त्या गोळ्या सोडतात. अर्थात् त्या खालीं पडतात. नंतर पितळी काढून घेऊन पांच गडव्यांतलें थंडपाणी तिच्या डोक्यावर ओततात. यावेळीं आजीच्या मांडीवर नवरा मुलगा बसलेला असतो. पांच विवाहित बायका वाजत गाजत तळ्यावरून अथवा विहिरींतून पांच गडवे पाणी भरून घेऊन येतात तेंच पाणी त्या बायका आजीवर ओततात. मागून आजी व मुलगा घरांतल्या ऊन पाण्यानें स्नान करतात. आजी विधवा असली तरी सुद्धां हें न्हाण तिला घालतात, आजी नसल्यास धर्माची आजी कोणी-तरी बसवितात. गोळ्यांना लिंबोटया म्हणतात. म्हणून या न्हाणाला लिंबन्हाण म्हणतात. मुलीच्या मांडवांतसुद्धां मुलीच्या आजीचें लिंब न्हाण होतें. पण तें लग्नानंतर मुलगी नवऱ्या-कडे जाते त्या दिवशीं म्हणजे वरात निघण्यापूर्वी होतें. ही चाल हपसाण्यांत आहे. इतर जातींत उ. कुंभारांत व आग्र्यांत मुलाच्या स्नानाच्या वेळीं त्याच्याबरोबर त्याची आई, आजी, मावशी व आत्या ह्या बसतात व त्यांचेंहि न्हाण होतें. न्हाण झाल्यावर मुलाला बाशिंग बांधून तो मुलीकडे लग्नाला जाण्यास निघतो.

## बोडण.

( लेखक—ना. गो. चापेकर. )

बोडणाचा कुलाचार चित्पावनांतच आहे. पण तो प्रत्येक चित्पावनाकडे आहे असें नाहीं. बोडणाला निदान तीन सवाशणी व एक कोवारीण अवश्य सांगाव्या लाग-तात. या शिवाय घरची यजमानीण. सवाशणी चित्पावन जातीच्याच पाहिजेत. देशस्थ अथवा कऱ्हाडे या जातीच्या चालत नाहींत. शिवाय गर्भार नसलेली व मूल झालेली अशी स्त्री सवाशीण म्हणून पसंत करतात. कोवारीण सुद्धां चित्पावनच असून शिवाय ती दहावर्षांच्या पलीकडे गेलेली नसली पाहिजे. बोडणाला येणाऱ्या सवाशणी घरीं न्हाऊन येतात. बोडणाकरतां पुरण घालावें लागतें, तळण तळावें लागतें. खीर करतातच. बोडणाच्या दिवशीं देवी पुजतात. पूजेच्या अगोदर देवीसाठीं कणकेचें

अनुक्रमणिका

लेणारत करतात. म्हणजे पाट्याच्या आकाराचें कणकेचें सिंहासन व वरवंट्याच्या आकाराचें लोड वनवतात. लोडाला टेकून सिंहासनावर देवी ठेवतात. देवीच्या पाठीमागें " हाराडेरा " ठेवतात. हाराडेरा म्हणजे कणकेचें गडूच्या आकाराचें भांडें यांत दूध घालतात, वर झांकण असतें. सिंहासनाच्या चोहोंबाजूंस खांब करून ठेवतात. कणकेचे देवीला दागिने मणिमंगळसूत्र, नथ, जोडवींविरवल्या, बांगड्या, गेंडेवोरें इत्यादि करतात. निकल्ह्याची पितळेची परात घेऊन तींत सिंहासनस्थ देवी ठेवतात, परातींत पांच पानांवर पांच नैवेद्य ठेवतात. याच्या आधीं यजमानीण देवीची पंचामृती पूजा करते. या कार्याला ब्राह्मणाची गरज लागत नाहीं. देवी ताम्हणांत घालून पूजा करतात. पूजा केल्यावर ती परातींत धोतऱ्याच्या पानावर ठेवतात. येथें पुनः यजमानीण देवीची पूजा करते. पूजा करतांना कोंवारीण यजमानणीच्या उजव्या हाताला वसलेली असते. बाकीच्या सवाशणीहि परातीभोंवतीं बसतात. पूजा झाल्यावर सवाशणी व कोंवारीण देवीला हळद कुंकू वाहतात. त्यावरोवरच सर्वजणी भंडार वाहतात. भंडारहि कणकेचा असतो. असे पांच भंडार करतात. नंतर कणकेचे पांच दिवे केलेले असतात. ते लावून आरती देवीची करतात. दिवे ताटांत असतात. दिव्यांच्या बाजूला कणकेच्चीं दोन मुटकीं करून ठेवतात. दिव्यांना व मुटक्यांना कुंकू लावतात. दिवे तुपाचे असतात हें सांगण्यास नकोच. पण वाती फुलवाती असतात. सर्व बायका हातांत अक्षता घेऊन ताटाला हात लावतात. यजमानीण ताट धरते. आरतीनंतर परातींतल्या नैवेद्यांवर एकेक दिवा ठेवतात. देवीपुढें मुटकळीं ठेवतात. मग सवाशणी कोंवारीण व यजमानीण उताणे हात करून परातींत ठेवतात. संध्येची रुप्याची किंवा पितळेची पळी घेऊन तिला बायकांची गळेसरी गुंडाळतात अशा ह्या पळीनें यजमानीण देवीला पंचामृत पांच वेळां घालते, आणि मग बोडणाच्या बायकाच्या हातावर घालते. इतकें झाल्यावर सवाशणी, कोंवारीण व यजमानीण सर्व मिळून पितळींतले नैवेद्य कालवतात. कालवतानां एक वेगळीच सवाशीण राहिलेलें पंचामृत बोडणांत घालते. नंतर यजमानीण कोंवारणीस विचारते " धायलीसका " अगोदर शिकवून ठेवल्याप्रमाणें कोवारीण होय म्हणते. बोडणाच्या सवाशणी आपल्यावरोवर आपल्या घराहून दूध आणतात तें यावेळीं बोडणांत घालतात. तसेंच यजमानीण आपल्या घरांतलें दूध घालते. बोडण कालवल्यावर घरांतील मंडळी नमस्कार करते. नंतर आंतील देवी यजमानीण घेऊन धुते. देवीला पुरण लावून धुतात. त्याचप्रमाणें बोडणाच्या बायकाहि हातांना पुरण चोळून हात धुतात. देवीला स्नान घातल्यावर यजमानीण तिला हळद कुंकू वाहते व तोंडाला साखर लावते आणि ती देवांत ठेवून नमस्कार करते. नंतर सवाशणी व कोंवारीण भोजन करतात. प्रत्येकीला अर्धा आणा दक्षणा मिळते. कोंवारीण व सवाशीण मायलेकी असतां कामा नये. कुळांत कोणीहि गर्भार स्त्री असल्यास बोडण घालीत नाहींत. एवढेंच नव्हे तर कोणत्याहि गर्भार स्त्रीनें बोडण पाहतां कामा नये. पाहिलें असतां गर्भपात होतो असा समज आहे. बोडण बारा वाजण्याच्या आंतच भरलें पाहिजे असा निर्वंध आहे. बोडणाखालीं म्हणजे परातीखालीं जी रांगोळी काढतात ती इतर रांगोळीहून निराळ्या प्रकारची असते, तिचा

नमुना पुढें दिला आहे. बोडणालाच मोटन म्हणतात. मेहेंदळेकृत कृत्यसंग्रहावरून

**बोडणाच्या रांगोळीचे नमुने.**




यागश्वराची ही पूजा आहे असें दिसतें. बोडण हा शब्द बव्होदन किंवा वर्धन यावरून निघाला असावा.

# हात रे

लहान मूल रडूं लागलें म्हणजे आई हात रे हात रे असें म्हणत असते. ह्या हात रे शब्दांचा अर्थ काय ? हात व रे असे हे दोन शब्द आहेत. रे हें संबोधनवाचक आहे. हात शब्दाचा अर्थ आपणांस निश्चित करावयाचा आहे. राजापूरचे रा. पाटणकर लिहितात " वे. रा. नारायण वामन शास्त्री जोशी आंजर्लेकर यांनीं सांगितलेली व्युत्पत्ति बरीशी वाटते. भूतः प्रेतः पिशाचः हतः रे " हतः रे याचाच अपभ्रंश हात रे असावा. भूत पिशाच दृष्टी समोर असल्यानें मूल रडतें अशी कल्पना यांत आहे. भूत अदृश्य असतें, पण मुलांना दिसतें व त्याच्या भीतीनें तीं रडतात. आई मुलाला म्हणते मीं पिशाचाला मारलें आतां तूं रडूं नकोस. पिशाच्याची कल्पना सर्वव्यापी आहे. " हताः ब्रह्मद्विषः हताः परिपंथिनः हताः अस्यकर्मणो विघ्नकर्तारः " याप्रमाणें पुण्याहवाचनांत म्हणत असतात हें सर्वांस अवगत आहेच. तेव्हां हतः रे पिशाचः हा तर्क अगदींच निराधार वाटण्यासारखा नाहीं. "हातरे" यावरून बायकांच्या तोंडीं असलेली जी एक म्हण " हातरे हुतरे पाठीस लागलें कुतरें " तिची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं.

# राजवाडे स्मारक



या सोबत राजवाडे स्मारकयोजकांचें विनंतिपत्र दिलेलें आहे तिकडे अखिल महाराष्ट्राचें लक्ष वेधेल अशी आम्हांस उमेद आहे. जिवंतपणीं मनुष्याची वास्तविक किंमत कळत नाहीं असा सामान्य नियम आहे. माणसाचें चीज होण्यास त्यास मरावें लागतें ही खेदाची गोष्ट आहे. मनुष्य जिवंत असतांना त्याच्याकडे निर्विकार मनानें पाहणारा इसम विरळा. आगगाडीचें एंजीन चालू असतें तेव्हां त्याच्याखालीं कांहीं तरी प्राणी चिरडतात व त्यामुळें त्यांचे बंधुजन एंजिनला शिव्याशाप देतात हें स्वाभाविक आहे. पण एंजीन विझाल्यावर कोणालाहि त्यापासून इजा होण्याचा संभव नसल्यामुळें एंजिनची अद्भुत शक्तीच सर्वांना विस्मयचकित करून सोडते. राजवाड्यांचें एंजीन आतां उपशम पावलें आहे. तेव्हां त्यांची कृति इतःपर निर्मेळ मनानें विवेकिली जाईल यांत संशय नाहीं. अपूर्व बुद्धिमत्ता, अचाट उद्योग, अमर्याद महाराष्ट्राभिमान, अतुल स्वार्थत्याग, इत्यादि गुणांचा पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेला याचा प्रत्येक महाराष्ट्रियास अभिमान वाटला पाहिजे; आणि हा अभिमान राजवाड्यांच्या योजलेल्या स्मारकाला मूर्त स्वरूप देण्यांत व्यक्त होईल अशी आम्हांस आशा आहे.



# परिभाषा.

( लेखक- कृष्णाजी विनायक वझे, नाशीक. )

पाश्चात्य संस्कृति आज कितीहि उच्च दर्जाला पोंचली असली तरी तिच्यांत अद्याप सर्व शास्त्रांचें नीट एकीकरण झालेलें नाहीं. संस्कृत भाषा ही खरोखरच संस्कृत असून तिच्या शास्त्रांचें पूर्ण एकीकरण झालेलें होतें असें तिच्या परिभाषेवरून सिद्ध करून देतां येतें. या परिभाषेवरून प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत सगळ्या शास्त्रांचें एकीकरण कसें झालें होतें हें या लेखांत दाखवावयाचें आहे. पूर्ण संख्या व अपूर्ण संख्या यांचा विचार करतांना गणितशास्त्रानें असा सिद्धांत काढला आहे कीं, ज्या संख्येचा घात केला असतां त्या घाताची किंमत मूळ संख्येपेक्षां कमी होते ती संख्या अपूर्ण व जिच्या घाताची किंमत तितकीच रहाते अगर जास्त होते ती रक्कम पूर्ण होय. पूर्ण व अपूर्ण यांचीं परीक्षा करण्याची घात करणें ही सर्वव्यापी कसोटी आहे. याप्रमाणें सर्वव्यापी व देशकालातीत अशी जी कसोटी तिला सिद्धांत असें म्हणतात. सिद्धांत म्हणजे ज्याचा अंत सिद्ध आहे, ज्यांत पुढें मागें केव्हांहि फेरफार होणें शक्य नाहीं तो सिद्धांत. शास्त्राचे सिद्धांत असे सर्वव्यापी व सर्वकालीं अभेद्य असावे लागतात. सृष्टीच्या उत्पत्तीपासून सृष्टीच्या शेवटापर्यंतचा एका विषयाचा विचार करणारा जो ग्रंथ तो त्या विषयाचें शास्त्र होय. पाश्चात्यांचीं शास्त्रें अद्याप याप्रमाणें शास्त्र या नांवाला योग्य झालीं नाहींत. व्यक्तिशः शास्त्रांची जर ही स्थिति तर निरनिराळ्या शास्त्रांचें एकीकरण व त्या सर्वांची एक परिभाषा ही तर गोष्ट लांबच राहिली. संस्कृत भाषेकडे पाहूं लागलें म्हणजे मात्र ही गोष्ट सिद्ध झालेली होती; सर्व ज्ञानाचें एकीकरण तींत झालेलें होतें व परिभाषा एक केलेली होती असें दिसतें.

ज्याप्रमाणें संख्यांचे घात करतात त्याचप्रमाणें पूर्ण किंवा अपूर्ण वस्तूंची परीक्षा करण्यासाठीं त्यांचेहि घातच करतात. संख्येच्या द्विघाताला वर्ग व त्रिघाताला घन अशीं नांवें आहेत. सामान्य व्यवहारांत याच घातांना महत्त्व आहे. कारण लांबी व रुंदी यांचा गुणाकार करून आलेलें क्षेत्रफळ हें वर्गस्वरूपाचें असतें व यालाच उंचीनें गुणून आलेलें परिमाण घनस्वरूपाचें असतें. संस्कृतांत लांबीला आय, रुंदीला व्यय व उंचीला उदय अशीं इ ( जाणें ) या धातूपासून झालेलीं नांवें आहेत. मूलाक्षरांतील स्वर हे पूर्ण असून व्यंजनें हीं अपूर्ण आहेत. स्वरांच्या वर्गाला ' गुण ' व धनाला ' वृद्धि ' अशी नांवें असून गुण व वृद्धि यांनीं स्वरांची किंमत वाढते. दीर्घ व प्लुत ह्या स्वरांच्या वेरजा असून गुण व वृद्धि हे त्यांचे घात आहेत. वाक्यांचे जटा व घन हे घात आहेत. जें वाक्य अनेक वेळां वाचलें तरी त्याच्या वाचनानें अर्थ जास्त जास्त स्पष्ट व मनोरंजक होत जातो तें पूर्ण म्हणजे चांगलें वाक्य व जास्त वेळां वाचल्यानें जें वाक्य नीरस किंवा कंटाळवाणें वाटतें तें अपूर्ण म्हणजे वाईट वाक्य होय. ज्यांचा घात केला असतां तुकडे होऊन शक्ति कमी होते ते घन पदार्थ हलके, व दाबानें ज्यांची शक्ति वाढते ते द्रव, व वायुरूप पदार्थ श्रेष्ठ होत. तावण्यानें ज्यांची किंमत उतरते ते खनिज पदार्थ हलके व ज्यांची किंमत वाढते ते खनिज पदार्थ श्रेष्ठ होत. वनस्पतिद्रव्यांना पण ही घाताची कसोटी लागते. जे प्राणी अडचणींत सांपडले असतां सुखरूप बाहेर पडतात ते श्रेष्ठ व जे प्राणी संकटांत घाबरून जातात ते हलके होत. कैद वगैरे दुःखें सोसून ज्यांची लोकमान्यता वाढते ते मनुष्य श्रेष्ठ होत व ज्यांची योग्यता कमी होते ते मनुष्य हलके होत. अगदीं अंत पाहून जे सद्गुण अभंग रहातात ते श्रेष्ठ व संकटांत जे भंग पावतात ते सद्गुण हीन होत. असा हा घाताचा सिद्धांत आहे.

कोणच्याहि गोष्टीचा विचार करण्याला आपण चौकशी करणें असें म्हणतों. चौकशी म्हणजे चौचार कशी ( कसाला लावुन पहाणें ) होय. हे चार कस—

किमिदं ? कथमिदं जातं ? को वा कर्तास्य विद्यते ? ॥
उपादानं किमस्तीति विचारः सोयमीदृशः ॥

अनुक्रमणिका

किमिदं हें काय आहे हा पहिला कस; कथमिदं जातं हें झालें कसें हा दुसरा कस; को वा कर्तास्य विद्यते याचा कर्ता कोण हा तिसरा कस; व उपादानं किमस्ति याचें सामान कोणतें हा चवथा कस; असे हे चार कस विचार करतांना लावावयाचे असतात. या चार कसांनांच शिल्पशास्त्रांत वर्ण, लिंग, वय, व अवस्था अशीं पारिभाषिक नांवें आहेत. कोणतीहि जिन्नस कोणत्या दर्जाची आहे हें तिच्या वर्णावरून ठरतें. वर्ण ही प्रतवारी लावणारी कसोटी आहे. रंगावरून ही प्रतवारी घेतली आहे. पांढरा रंग यावर जो प्रकाश पडतो तो सर्व त्याकडून परत केला जातो म्हणून हा रंग किंवा वर्ण पहिल्या प्रतीचा होय. तांबडा रंग हा दुसरी प्रत, पिंवळा हा तिसरी प्रत, निळा हा चवथी प्रत व काळा म्हणजे रंगाचा अभाव किंवा वर्णहीनत्व होय. याप्रमाणें कोणत्याहि वस्तूवर खर्च केलेल्या शक्तीचें जें फळ मिळतें त्यावरून तिचा वर्ण ठरतो व तिची प्रतवारी लागते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज अशा त्या प्रतवारींना पारिभाषिक संज्ञा आहेत. उपकाराचें फळ मिळणें ही कसोटी उच्चनीचत्व ठरविण्याला उत्तम आहे. कोणीहि इसम ही कसोटी अमान्य करणार नाहीं. ज्याला दिलेलें उसनें सगळें परत मिळतें तो उत्तम व ज्याच्याकडून उसनें दिलेलें द्रव्य मुळींच परत मिळत नाहीं तो हलका होय. झाडें, गुरें, माणसें, धातु, लांकडें, वगैरे सृष्टींतील सर्व वस्तूंना ही चातुर्वर्ण्यव्यवस्था लागू आहे.

मूळाक्षरांत लोकांना आपलें सर्वस्व देणारे स्वर ब्राह्मण, क, ग, हे क्षत्रिय, ख, घ, हे वैश्य, अनुनासिकें हे शूद्र व कोणाशींहि न मिळतां कायम रहाणारे श, ष, आणि स हे अंत्यज होत. याचप्रमाणें ग्रहांत, खनिज द्रव्यांत, वनस्पतींत, पशूंत, माणसांत, विद्यांत, शास्त्रांत वगैरे सर्व गोष्टींत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज ही वर्गवारी आहे. सृष्टि निर्माण होतांना पहिल्यानें पांढरा प्रकाश निर्माण झाला व वस्तु-सूर्यासारखे तेजोगोल-जसजशा निवत गेल्या तसतसे त्यांचे रंग लाल, पिंवळा, निळा वगैरे इंद्रधनुष्याच्या अनुक्रमानें बदलत गेले. जगांत घनत्व आल्यावर घन वस्तूंची सावली किंवा अंधार पडूं लागला. यासाठीं प्रकाशांत अंधार हा अंत्यज-शेवटीं उत्पन्न झालेला आहे. सूर्यमालेंत पहिली सावली चंद्राची पडली व या अंधाराला 'केतु' हें नांव दिलें आहे. कारण हा अंधार पताकेच्या फडक्याप्रमाणें चंद्रापासून निमुळता होत गेलेला असतो. यानंतर पृथ्वी घन झाली व तिच्या सावलीला 'राहु' हें नांव दिलें. व मग हा दोन्ही सावल्या मिळून राहु झाला व त्या राहूचें चंद्राची सावली जो केतु तें डोकें व पृथ्वीची सावली तें धड असें म्हणूं लागले. या राहूची चंद्र ही डोक्याची कवटी व त्या सावलीचें शेवट-पृथ्वीपाशीं आलेलें शेवट-ती मान व पृथ्वीची सावली हा खांद्याचा रुंद भाग व तेथून पुढें निमुळती होत गेलेली पृथ्वीची सावली म्हणजे पाय होत. याप्रमाणें सूर्याच्या प्रकाशामुळें पडलेली चंद्र, चंद्राची सावली, पृथ्वी व पृथ्वीची सावली मिळून हा राहु नांवाचा अंत्यज झाला. सगळा प्रकाश खाऊन टाकणारा हा अंत्यज सर्व पदार्थांत हीन असून तो सूर्यचंद्रांना सुद्धां खाऊन टाकणारा आहे हें आपण पहातोंच.

वर्णानंतरचा परिभाषेचा दुसरा भाग म्हणजे लिंग होय. घेतलेलें परत करण्याच्या प्रमाणावरून ज्याप्रमाणें वर्ण हे आनुवंशिक गुणदर्शक आहेत त्याचप्रमाणें पुढचें लिंग हें शरीररचनेवरून प्राप्त होणाऱ्या गुणांचें निदर्शक आहे. सामान्यतः लिंगांचे निदर्शक गुण व त्यांचीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत त्यावरून हें लिंग सर्व वस्तूंना कसें लागतें व संस्कृत भाषेंतील लिंगें हीं वस्तूंचे गुण कशीं दाखवितात हें कळेल.

पुंलिंग-पुरुषत्व दाखविणारें लिंग

| दाखविलेला गुण | उदाहरण |
|---|---|
| वरील वोजानें दबत नाहीं | पुरुषः, स्तंभः, दाराः, राजा, प्रणिधिः |
| एक जीवाचा | पाषाणः, संघः, लोकः, अंशः, अणुः |
| कणीदार | नीहारः, स्फुलिंगः, किरणः, |
| सारख्या आकाराचा | शंकुः, कीलः, दंडः, पटः, |
| बाहेर मऊ व आंत कठीण | आम्रः, पनसः ( अंतःसार झाडें ) |

| | |
|---|---|
| चपल | रवः, वायुः, मरुद्, अंशुः, तरंगः |
| मजबूत पण हल्का | रथः, अक्षः, विमानः, शपथः |
| साहसी व स्वतंत्र | योधः, वीरः, नायकः, परागः |
| व्याप नसणारा | अणुः, बिंदुः, कणः, |

स्त्रीलिंग ( स्त्रीत्व दाखविणारें लिंग )

| | |
|---|---|
| आडवी ताणली तर तुटत नाहीं | प्रकृतिः, जाया, कोटिः, बोधिका |
| थराथराची | हिमानी, शिला, आपः, पृथ्वी, भित्तिः |
| धागेदार, तंतुमय | रज्जुः, ज्या, इच्छा, आशा, धीः |
| एक बाजूस निमुळती | सूचिः, वाहिनी, नदी |
| बाहर कठीण व आंत मऊ | वेणुः, पूगी ( बहिःसार झाडें ) |
| स्थीर, मंद | शरद्, प्रावृट् प्रभा, योषा |
| मजबूत पण जड | नौः, नौका, इष्टका, दृषद्, |
| संपन्न पण परावलंबी | प्रजा, पृतना, सेना, स्त्री, |
| फार व्यापाची | धरा, रेपा, आकृतिः, अरण्यानी |

बुध, शुक्र, चंद्र व पृथ्वी हे स्त्री ग्रह होत

रवि, मंगळ, गुरु, शनि हे पुरुष ग्रह होत

नपुंसक ( पुरुष वाटतील पण तसें नव्हे तें लिंग )

| | |
|---|---|
| ठिसूळ | पत्रं, पुष्पं, फलं, मित्रं, कलत्रं, हिम |
| बिलबिलीत | नवनीतं, घृतं, दधि, तैलं, |
| अनेकवळ व पीळाची | काष्ठं, शरीरं, धनुः, |
| दोन्ही टोंकांस निमुळती | अंडं, ब्रह्म, वनं, इल्वलं, |
| मंद, अशक्त | वाल्कं, कमलं, वेत्रं |
| चंचल | मनः, रजः, पयः, स्रोतः |
| अविश्वासुक | शकुनं, मनुष्यं, द्रव्यं, |

या लिंगांचा योग्य उपयोग नवीन परिभाषा करतांना केला पाहिजे. उदाहरणार्थ तिकीट शब्द स्त्रीलिंगी किंवा नपुंसकलिंगी समजावा. यंत्रांचे पट्टे हे स्त्रीलिंगी ( त्यांना संस्कृतांत 'वहनी' शब्द आहे, ) समजावे. मोटार हा शब्द स्त्रीलिंगी असून एअरोप्लेन, बांब हे पुंलिंगी असावेत. रेडिओ, फोनो हे पुंलिंगी व पांचेट नपुंसकलिंगी समजावा. वगैरे

तिसरा कस म्हणजे वय. वस्तु जन्माला आल्यापासून गेलेला जो काळ त्याला वय म्हणतात. या कालांत वरतून जे फेरफार झाले त्यांना अवस्था म्हणतात. वयें पांच असून अवस्था चार आहेत, बालत्व, कौमार, यौवन, वार्धक्य व मरण हीं पांच वयें असून त्यांपैकीं बालत्व व मरण या वयांतील वस्तु निरुपयोगी होत. या दोन वयांत वस्तूंत शक्ति नसते. प्रकृति, संस्कृति, संकृति व विकृति या चार अवस्था असून त्यांतील विकृति अवस्था त्याज्य व प्रकृति अवस्था मध्यम होय. संस्कृति व संकृति या दोन अवस्था चांगल्या वस्तूवर निरनिराळे संस्कार करून ती जेथें वापरावयाची त्या कामाला योग्य झाली म्हणजे ती संस्कृति अवस्था होय. या संस्कृति अवस्थेंतहि वस्तूंच्या अंगीं कांहीं गुणांचा अभाव राहिला तर त्या गुणांची भर घालण्यासाठीं तींत दुसऱ्या वस्तूंची मिसळ करतात त्याला ' संकृति ' म्हणतात. संस्कृति व संस्कृति करतांना काय करावें लागतें व त्यामुळें कोणते पारिभाषिक शब्द प्रचारांत येतात. त्यांचा विचार पुढील लेखांत करूं.

पाढे शिकवितांना आपण मुलांना एकोत्तरी शिकवीत असतों. एकोत्तरी ही वर्गांची श्रेणी आहे व हिला एकोत्तरी कां म्हणतास याचा येथें विचार करूं. एकोत्तरी म्हणजे जींत एक जास्त असलेली संख्या मिळ-

विलेली आहे ती श्रेणी. एक, दोन, तीन, चार ही सरळ संख्यांची एकपदरी श्रेणी आहे. हिच्यापासून तीन, पांच, सात, नऊ ही दोनपदरी श्रेणी होते. शून्य व एक, एक व दोन, दोन व तीन व तीन व चार अशा संख्यांच्या जोडयांच्या बेरजेनें ही श्रेणी तयार होते. यजुर्वेदांत ही श्रेणी

एकाचमे, तिस्रश्चमे; पंचचमे, सप्तचमे

अशी सांगितली आहे. या दुहेरी श्रेणीची फिरून बेरीज करून तिहेरी श्रेणी होते व ती यजुर्वेदांत

' चतस्रश्चमेऽष्टौचमे, द्वादशचमे, षोडशचमे '

अशी सांगितली आहे. एकोत्तरी ही अशाच तऱ्हेची परंतु संयुक्त श्रेणी. मागील वर्गात वर्गाची मूल संख्या व तींत एक अधिक मिळवून आलेली संख्या मिळविल्या म्हणजे एकोत्तरी श्रेणी होते. उदाहरणार्थ, एकी-एकी एक यांत एक व दोन मिळविले म्हणजे बे बे चार होतात व या चारांत दोन व तीन मिळविले म्हणजे तीनतीन नऊ होतात. सामान्य संख्येंत सांगावयाचें म्हणजे क वर्गात क व क अधिक एक मिळविले म्हणजे क अधिक एकाचा वर्ग येतो. प्राचीनकाळीं गणितांत पहिल्यानें परिकर्माष्टक शिकवीत असत. बेरीज, वजावाकी, गुणाकार भागाकार, वर्ग, वर्गमूळ घन व घनमूळ या आठ गोष्टींनां परिकर्माष्टक म्हणतात व यासाठीं संख्या, पाडे, अकरकी व एकोत्तरी या गोष्टी लागतात व म्हणून त्या पहिल्यानें शिकविण्याचा प्रचार आहे.

प्राचीनकाळीं धडे विद्यार्थ्यांनीं अगोदर वाचून येण्याची चाल नव्हती. पहिले दिवशीं गुरुजींनीं धडा समजावून सांगावयाचा. मग विद्यार्थ्यांनीं तो वाचून विचार करून दुसरे दिवशीं आलेल्या शंका विचारावयाच्या व त्यांचें समाधान झालें म्हणजे तिसरे दिवशीं तो घोकून पक्का करावयाचा असे व त्यासाठीं या घोकण्याला ' परवांचा ' परवां सांगितलेला धडा घोकणें म्हणत. ' परवांचा ' हा शब्द याप्रमाणें पारिभाषिक आहे.

प्राचीनकाळीं लिहावयाचीं अक्षरें मातींत कोरून लिहिण्यास शिकवीत असत व म्हणून दर एक मुलानें एक पाटी म्हणजे टोपली व माती घेऊन गुरुजीकडे जावें लागत असे. या मातींत एका काडीनें अक्षरें कोरीत व या काडीला लेखनी 'कोरणारी काडी ' म्हणत. पुढें टोपलीच्या ऐवजीं रंगीत लांकडी फळी घेऊन जात व या फळीवर धूळ घालून तींत अक्षरें कोरीत. हीं अक्षरें कोरण्याची पद्धति मुंजींत गायत्री मंत्र शिकवितांना अद्याप पहाण्यास सांपडते. आतां विद्यार्थी दगड किंवा धातूचा पत्रा घेऊन त्यावर खडू वगैरेंनीं अक्षरें रंगवितात, तरी लिहिण्याच्या पत्र्याला पाटी व काडीला ' लेखनी ' च म्हणतात. पाटी लेखनी हे याप्रमाणें पारिभाषिक शब्द असून त्यांत अक्षरें कोरून काढावीं लागत ही कल्पना गुप्त आहे. हल्लींचें आपलें लिहिणें हें लेखन ( कोरणें ) नसून लिपी किंवा लेपन (सारवणें) आहे. पानें ( ताडपत्र वगैरे ), लांकूड किंवा दगड, धातु यांवर अक्षरें कोरून काढणें म्हणजे लेखन. शिलालेख, ताम्रपट लेख हे खरे लेख असून कागद वगैरेवर लिहिणें म्हणजे लेपन होय. ( पुढें चालू )



# शब्दसंग्रह.

( ना. गो. चापेकर. )

बदलापूर आणि अर्थात् बदलापुराच्या आसपास बैल गाडीच्या संबंधानें जे शब्द वापरण्यांत येतात ते.

**गाडी**—मोठी, लांब, बारदानी अथवा माल नेण्याची गाडी.

**छकडा—डी**<br>**रेकला**<br>**बैली** } माणसें बसावयाची लहान गाडी.

## गाडीचे अवयव.

**साटी**—जींत बसतात अथवा माल ठेवतात ती.
साटी ही खुंटे, करळया, बावखंडें, गात, पोट खुंटे व साट यांची बनविलेली असते.

**करळी**—उभे खुंट ज्यांत बसवतात त्या दोन लांकडां पैकीं वरच्या लाकडाला करळी म्हणतात.

**बावखंड**—खुंट्याच्या खालचें लाकूड.

**गात**—साटीचें पुढलें व मागलें लाकूड.

**धुरांडी** ( अनेकवचन धुरांड्या )—साटीच्या पुढें उभी मारलेलीं दोन लाकडें. धुरांड्यांवर जोकड असतें.

**आटा**—दोन धुरांड्यांमधील एक तिसरें लाकूड.

**धुऱ्या**—धुरांडीवर जोकड ज्या ठिकाणीं असतें तेथें धुरांडीला भोक पाडून आंत लाकडाची पट्टी बसवतात ती.

**जोकड**—बैलांच्या मानेवर ठेवतात तें.

**शिवळा**—बैल सरूं नये म्हणून जोकडाला भोकें पाडून त्यांत घालण्याच्या खुंट्या ह्या बैलाच्या मानेच्या दोन बाजूला येतात.

**जुंपण्या**—बैलाची मान जोकडाला ज्यांनीं अडकवितात त्या.

**नाडा**—धुरांड्या व जोकड यांस ज्या दोरखंडानें बांधतात तो.

**साटबंद**—साटी धुरांडीला ज्या दोरानें बांधतात तो दोर.

**ढेबरें**—धुरांडीवर बसविलेलें लाकूड. याच्यावर साटी येते.

**चाक**—१ धांव—लोखंडी वर्तुलाकार.
२ पाटे—लाकडी अर्ध वर्तुलाकार डुफळ्या.

३ अरे— तुंबा व पाटे यांच्यामध्यें मारतात ते.

४ तुंब, ५ सरी, ६ तोंड कडी, ७ कान खीळ.

**आंस**—लोखंडी गज, दोन चाकें दोन टोकांला ज्याच्या घालतात तो.

**खोबळा**—आंस ज्याच्या मध्यें बसवतात तो.

**पेटी**—खोबळ्यावरील लाकूड.

**डांबराखिळा**—पेटी, खोबळा व आंस यांना भोंक पाडून त्यांत लोखंडी खिळा बसवतात तो.

**खोबळपट्टी**—खोबळा आणि आंस यांच्या दरम्यान असलेली.

**नळा**—तेल ठेवण्याकरतां हा बांबूचा करतात.

**वंगारी**—चाकांना तेल लावण्याची काडी.

**कासरा**—बैलांच्या वेसणीला बांधलेली लांब सुंभाची किंवा सुतळीची दोरी

**झूल**—बैलांच्या अंगावर टाकतात तें कापड.

**चाबूक**—सुतळीचा—बैलांना मारण्यास.

**पराणी**—बैलांना टोचण्याकरतां काठींत बसवलेली लोखंडी चूक.

**खिट्या**—लाकडी खिळे.

**आंबवण**—तुंबाच्या तोंडांत बसवलेली लोखंडी वाटोळी पट्टी.

**शिपाई**—गाडी उभी ठेवण्याकरतां धुरांडीच्या खालीं जमिनीवर उभीं ठेवतात तीं दोन लाकडें.

**वेसण**—बैलांच्या नाकांतून ओवून मानेवर गांठ देतात अशी सुतळीची, किंवा वाकाची दोरी.

## इतर शब्द.

**वरखा**—गुराखी. हा शब्द गोरट प्रांतांत प्रचलित आहे.

**सोस**—पोस्त. आपल्याच चाकराला कांहीं विशेष काम करावें लागलें तर आणा दोन आणे किरकोळ गुळपाण्यास देतात त्यास सोस म्हणतात.

**काढा**—काढा काढणें. टोणग्यांची अथवा बैलांची झोंबी लागली म्हणजे एक टोणगा अथवा बैल दुसऱ्या टोणग्याच्या अगर बैलाच्या मागें धावत जाऊन पाठलाग करतो त्यास काढा काढणें म्हणतात. पाठलाग करणें. एक मनुष्य दुसऱ्याच्या मागें त्याला पकडण्याकरतां धांवू लागला म्हणजेहि त्याला काढा काढणें म्हणतात.

---

# मराठी ग्रंथसंपत्ति

मराठी भाषेमध्यें जे चांगले वाचनीय व मननीय ग्रंथ निर्माण होतील त्यांची नोंद या सदराखालीं करण्याचा आमचा विचार आहे.

मराठींत चरित्रें आजपर्यंत फार थोडीं होतीं; पण आतां ही उणीव झपाट्यानें भरून निघत आहे हें पाहून कोणालाहि आनंद झाल्याशिवाय रहाणार नाहीं. गेल्या सालीं रावसाहेब मंडलिकांचें चरित्र प्रसिद्ध झालें. यंदा तर लो. टिळकांचें चरित्र व डॉ. भांडारकरांचें चारित्र हीं प्रसिद्ध झालीं. डॉ. भांडारकरांच्या चरित्राचें सविस्तर परीक्षण लवकरच पत्रिकेंत होईल. याशिवाय ऋग्वेदाचें (मंडलें ८ व ९) भाषांतर याचाहि उल्लेख करणें जरूर आहे. स. १९२७सालीं प्रतापगडचें युद्ध, प्रार्थना समाजाचा इतिहास, बौद्ध धर्माचा अभ्युदय, तुकारामाच्या अभंगांची चर्चा, स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें, नवयुगधर्म इत्यादि कांहीं चांगल्या पुस्तकांची मराठी वाङ्मयांत भर पडली यांत संशय नाहीं.

टिळकांचें चरित्र घाईघाईनें लिहिलें गेलें नसतें तर बरें झालें असतें, अनुस्वार गाळण्याचा प्रकार तर अगदींच असमर्थनीय आहे.

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद.

बरींच वर्षें संमेलनें अधून मधून भरल्यावर मग एकंदर ग्रंथकार, प्रकाशक व लेखक वगैरेंची एक सुसंघटित संस्था असावी अशी आवश्यकता फारच भासूं लागली. मग बडोदें मुक्कामीं भरलेल्या संमेलनांत (१९०९) एक कमिटी नेमण्यांत येऊन महाराष्ट्र "साहित्य परिषदेची" कायमची रचना करण्याचे कामास प्रारंभ झाला.

पुढील संमेलन १९२२ सालीं वऱ्हाडांत अकोल्यास भरलें, तेथें वरील बडोदें कमिटीचा रिपोर्ट येऊन त्यावरून तयार झालेली घटना मान्य झाली. याप्रमाणें परिषदेच्या स्थापनेचा इतिहास आहे. पुढें इंदुरास संमेलन भरलें त्यावेळीं श्री. सवाई तुकोजीराव महाराज सरकारांकडून दहा हजार रुपयांची मोठी मदत मिळाली. कांहीं ग्रंथांना बक्षिसें वगैरे देऊन आणि अन्य प्रकारें आजवर परिषदेनें केलेलें कार्य थोडें फार सर्वश्रुत आहे. या कामीं पुष्कळांचें साहाय्य झालेलें आहे, परंतु आरंभापासून रा. वासुदेवराव आपटे, कै. रा. ब. महाजनी, कै. रा. सा. मोरमकर, रा. ब. पाध्ये, श्री. सरदार किबे, वगैरे सद्गृहस्थांनीं विशेष साहाय्य केलेलें आहे. अतःपर परिषदेचें कार्य सहकारित्वामुळें धडाडीनें चालेल अशी आशा आहे.

फा. व. ३०।४९. जुनाट पुरुष.

## ग्रंथपरीक्षण

# कौटिलीयं-अर्थशास्त्रम्=कौटिल्याचें अर्थशास्त्र.

( परीक्षक - नारायण कृष्ण गद्रे. )

वरील नूतनोपलब्ध ग्रंथ सध्यां विश्वविद्यालयीन पदवीच्या परीक्षेस एक अभ्यसनीय ग्रंथ म्हणून नियत झालेला आहे. आणि म्हणूनच प्रकाशकांनीं तो त्वरित प्रकाशित केला आहे. प्रकाशन अर्धग्रंथाचेंच झालेलें आहे. ग्रंथाचा विस्तार व ग्रंथास वापरलेला कागद आणि त्याचें कवच ह्यांचा टिकाऊपणा इकडे लक्ष दिल्यास ठेविलेलें मूल्य तीन रुपये कांहीं वावगें नाहीं. ग्रंथप्रकाशक गजानन रघुनाथ मुळे, करजत-जि० कुलाबा हे होत. उत्तराधिकारी मराठी भाषान्तरकार-१ रा. रा. जनार्दन सखाराम करंदीकर, दुय्यम संपादक "केसरी" पुणें, आणि २ रा.रा. बळवंत रामचंद्र हिवरगांकर, नगर-असे दोघे आहेत. रा. करंदीकराच्या प्रस्तावनेवरून त्यांचे चिरंजीव अनंतपंत ह्यांचेहि परिश्रम वडिलांचें काम हलकें पण निर्दोष व्हावें म्हणून अतिरिक्त झाले आहेत. या कामीं तिघांनींहि यावदुपलब्ध पूर्वप्रयत्नांचें-जर्मनादि-वैभाषिकांचेंहि- साहाय्य घेतलें असल्याचा उल्लेखहि रा. जनार्दनपंतांच्या प्रस्तावनेंत आढळतो. अर्थात् हे सर्व विद्वत्प्रयत्न सामान्य वाचकांस आणि परीक्ष्य विद्यार्थ्यांस चांगलेच उपकारक व्हावे ह्यांत कांहीं नवल नाहीं. मला हा ग्रंथ वाचण्याची म्हणजे तदर्थ समजण्याची पुष्कळ दिवसांची उत्कंठा होती. ती माझी उत्कंठा ह्या नवप्रकाशित पुस्तकानें सर्वथैव पूर्ण झाली असें मी मोठ्या आनंदानें लिहीत आहें. मराठी भाषान्तरानें केवळ संस्कृत मूळच वाचून अर्थ समजून घेण्यास मला जे परिश्रम-आणि तेहि कदाचित् विफल होणारे असे-पडले असते ते पुष्कळ वांचले असेंहि मी संतोषपूर्वक सांगतों. इतकें असूनहि मी जें हें परीक्षण लिहिण्याचा उपक्रम करीत आहे तो केवळ मला समजलें तें कितपत बरोबर अथवा वितथ हें अजमावितां यावें येवढ्याच साठीं ! मूळ ग्रंथ फार प्राचीन-२२५० वर्षामागचा. त्याची भाषा त्या काळची जिवन्त-नित्य व्यवहाराची, सर्वसामान्य साक्षरांच्या वापरांत असणारी. तथापि लेखन केवळ सूत्रात्मक, संस्कृतवाङ्मयाच्या सूत्रकारांच्या अत्यंत परिणतावस्थेंतील रचनेचा केवळ आदर्शच असा हा ग्रंथ आहे. मानवकल्पसूत्रें, पूर्वोत्तर मीमांसासूत्रें ह्याच काळाच्या आसपासचीं. त्याचप्रमाणें आजच्या श्लोकबद्ध मन्वादिस्मृतिग्रंथांचा, अथवा विस्तृत रामायण, महाभारतादि चारित्रैतिहासिक ग्रंथांच्या पूर्णावस्थेचाहि काल हाच. सूत्र म्हटलें म्हणजे-

**स्वल्पाक्षरमसंदिग्धं । सारवद्विश्वतोमुखम् ॥**
**अस्तोभमनवद्यं च । सूत्रं सूत्रविदो विदुः ॥**

असें असावयाचें. त्यांत द्विरुक्ति, व्यर्थ पाल्हाळ इत्यादि लवमात्र खपावयाचीं नाहींत. इतकेंच नव्हे तर पूर्वसंदर्भास अनुलक्षून साधेल तितका अध्याहार असावयाचाच. उद्देश्यविधेयसंयोगी क्रियापदादींचा तर नियमानेंच अध्याहार ! संकेतोत्पत्तीपूर्वीं प्रथमोपयुक्त पदांचा अर्थ त्यांच्या स्वाभाविक अशा प्राथमिकार्थानेंच घ्यावयाचे असतात. संकेतोत्पत्तीनंतर मात्र तत्तत्संकेतानुसारें आणि प्रकरणान्वयें संकेतोत्पन्न अर्थ घ्यावयाचे. ह्या गोष्टींकडे भाषान्तरकारांचें क्वचित् दुर्लक्ष झाल्याचा संशय मला एकाधिक वेळां आल्यामुळें मला त्यांचा येथें उल्लेख करावा लागत आहे. परीक्षणासाठीं प्रथमाधिकरणाचें दहावें प्रकरण अथेति

घ्यावयाचें योजिलें आहे. तथापि पूर्वापर संगतीसाठीं पहिलेहि कांहीं अध्याय इथेंतिथें पारखून पुढील अकरावारा अध्यायांचाहि क्वचित् परामर्श घ्यावा लागेल, इतकें सुचवून उद्दिष्टकार्यास प्रारंभ करितों.

१. मूळसंस्कृतांत प्रथमाधिकरणास ' विनायाधिकारिकम् ' असें विधिविशेषण लाविलेलें आहे, त्याचें भाषान्तर मराठींत मुळींच दिसत नाहीं. 'विनाय' हा शब्द नडला असावासें वाटतें. परंतु त्याचाच पर्याय ' विनय '-म्हणून ह्या अधिकरणाच्या प्रत्यध्यायान्ती वापरलेला आहे. त्यावरून अर्थलाभ सहज होऊं शकतो. अमरकोशांत 'नयो नाय' असा संकीर्ण वर्गोल्लेख आहे. रघुवंशांतहि 'प्रजानां विनयाधानात्' असा ' विनय' शब्दाचा वापर आढळतो. आपटे यांचे कोशांतहि विनय म्हणजे कर्तव्य-(स्वधर्मकर्म)--शिक्षा, नीतिशिक्षण असा अर्थ दिलेला आढळतो. जसें नय = नाय, तसेंच विनय = विनाय, उपनय = उपनाय (उपनयन = उपनायन) असे प्राचीनतम संस्कृतप्रयोग तिच्या जिवंतपणीं भरपूर होते. गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत । ब्राह्मणस्योपनायनम् ॥ असें गृह्यसूत्र आहे. सारांश 'विनायाधिकारिकम्' ह्या विशेषणाचा अर्थ मुख्यत्वें शिक्षणाचाच विचार ज्यांत केला आहे असें म्हणजे **शिक्षणाधिकार(नाम)क.**

२. **ॐ नमः शुक्रबृहस्पतिभ्याम्** असें ग्रंथारंभींचें मंगलाचरण मूळांत आहे. त्याचा अर्थ 'श्री शुक्र व बृहस्पती यांना नमस्कार असो' असा केला आहे. यांत विशेष दोष जरी नाहीं तरी श्रीकारानें जी ॐकाराची भूमि व्यापिली आहे ती अनुचित होय; आणि बृहस्पती याची दीर्घ केलेली ती ही अशुद्ध म्हणून चिंत्यच होय. ग्रंथकर्ता वेदत्रयी (एकवचनी प्रयोग), अथर्वेतिहासवेदौ (द्विवचनी प्रयोग) मिळून होणारे तीनच वेद म्हणजे ज्ञान देणाऱ्या स्वतःप्रमाण अशा तीनच विद्या कर्तव्य-धर्मकर्म-संबंधी आज्ञापक मानणारा आहे. कारण तृतीयाध्ययांत तो, या (**एष त्रयीधर्मः**) त्रयीचें अनुशासनच (**चतुर्णां वर्णानामाश्रमाणां च धर्मस्थापनादौपकारिकः**) चारी वर्णांचीं आणि आश्रमांचीं निज निज धर्मकर्तव्यें स्थापित करण्यास उपयोगी पडलेलें आहे, असें स्पष्ट सांगत आहे. ह्या तृतीयाध्यायान्तर्गत वरील सूत्राचें भाषान्तर अस्पष्टबोधक आणि अंशतः चिन्त्य असेंच झालेलें आहे. तेव्हां अशा श्रद्धेचा, स्वधर्माचरणीं दृढ असणारा हा ब्राह्मण ग्रंथकर्ता पौराणिक संप्रदायानुसारी श्रीकार आरंभीं कधींच उच्चारणार नाहीं. हा बोध भाषांतऱ्यांच्या शब्दयोजनेंतहि नष्ट होतां कामा नये. त्याचप्रमाणें ॐकाराचा लोपहि आजच्याहि ब्राह्मण भाषान्तरकारांस पापाचांच जोड करविणारा होय. हें पाप प्रायश्चित्तार्ह किंवा अक्षम्य जरी नसलें तरी 'क्षमस्व भगवन्निति' उच्चारपात्र हें निश्चित ! एष त्रयीधर्मः येथील केवळ तोच त्रयीधर्म हा शब्द वापरून केवळ मराठीच भाषा जाणणाऱ्या सुशिक्षित ब्राह्मणेतरांस तर राहोच पण ब्राह्मणांसहि आणि पदवीपरीक्षाफलार्थ्यांसहि ग्रंथकर्त्याच्या यथार्थाभिप्रायाचा बोध कसा व्हावा हाहि प्रश्न विचारणीय वाटतो. भाषान्तरकर्त्याचा आशय समजविणारें भाषान्तर मूळग्रंथकर्त्याचा अभिप्राय जर दूषित करील तर तें भाषान्तर नसून अर्थान्तर होय. हाच प्रकार द्वितीयाध्यायांत प्रथम सूत्रांतील 'आन्वीक्षिकी' शब्दाचा, तृतीय सूत्रांतील 'संवरणमात्रं' या शब्दाचा आणि 'लोकयात्राविद्' या पदाचा अर्थ चिन्त्य कल्पिल्यामुळें त्या सर्व सूत्राचाहि अर्थविपर्यास झाला आहे. आन्वीक्षिकी शब्दाचा अर्थ वेदत्रयीमूलक न्यायदर्शन असाच तेथें अभिप्रेत आहे. स्वतंत्र (नास्तिक) तर्कशास्त्राचा म्हणजे वेदांचें स्वतःप्रामाण्य न स्वीकारणाऱ्या तर्कशास्त्राचा स्पर्शहि तेथें असह्य होय. अमरकोशकार वेदत्रयी, सेतिहास वेदांगें यांच्यामागून लगेच आन्वीक्षिकीचा उल्लेख तर्कविद्या अशा अपरपर्यायानें देतो तरी चाणक्यामागूनचा अर्थशास्त्रसंग्रही जो कामंदकीनीतिसारकर्ता तो 'आन्वीक्षिक्यात्मविद्या स्यात्' असें सांगून जो अर्थ दर्शवितो तो म्हणजे Metaphysics हा अर्थच ग्राह्यतर आणि अन्वीक्षा प्रयोजनमस्याः याच व्युत्पत्तीनें वेदत्रयमूलक न्यायदर्शन हाच घेणें उत्तम. न्यायशब्दाची व्युत्पत्तिहि नीयते अनेन अशी असून वेदत्रयीदर्शित पथ, पद्धति असा अर्थ आपटे आपल्या कोशांत लिहितात आणि उदाहरणास 'न्यायैस्त्रिभिरुदीरणं' ह्या कुमारसंभवांतील वाक्यखंडावरील मल्लिनाथी टीकेचा बाध करूनहि

'It is quite open, in our opinion, to take न्याय in the sense of 'a system' or 'way' which are manifested in the three systems, i. e, ऋक्, यजुस् and सामन्' असा अभिप्राय दाखवितात. येथेंहि याच द्वितीयाध्यायाच्या दुसऱ्या सूत्रांत 'त्रयीविशेषो ह्यान्वीक्षिकीति' असें मानवकल्पसूत्रकारांचें स्पष्ट निर्धारणच आहे. वेदमंत्रांचें मननचिंतन एतदात्मक अध्यात्मविद्याच आन्वीक्षिकी ह्या विद्याप्रकारानें येथें अभिप्रेत आहे असें मानणें हें ग्रंथकर्त्याचा काल आणि त्याची विचारसरणी लक्षांत घेतां अपरिहार्य आहे. कारण स्वतः ग्रंथकार याच अध्यायाच्या उत्तरार्धांतील स्वसमारोपक सूत्रांत 'सांख्यं योगो लोकायतं चेत्यान्वीक्षिकीति' असें म्हणतो. भगवद्गीतेंत ज्यांचा उल्लेख आहे त्याच सांख्य आणि योग या आस्तिक दर्शनांचाच समावेश तो आन्वीक्षिकींत करीत असून शेवटीं गौणत्वानेंच 'लोकायतं' म्हणजे चार्वाकदर्शनाचा उच्चार करीत आहे हें स्पष्टच होय. पैकीं सांख्यप्रणेते कपिलमहामुनि आणि योगप्रणेते ऋषि पतंजलि हे होत. हे दोघेहि कट्टे वैदिक. 'संवरणमात्रं' याचा अर्थ 'वेदविद्या हें लोकव्यवहारचतुर माणसाचें आवरण आहे' असें ते (बार्हस्पत्य) समजतात. या भाषान्तरकारांच्या वाक्यानें जो माझ्यासारख्या वाचकाच्या मनांत अर्थ येतो तो कांहीं वेदगौरवपर नसून उलटसाच भासतो. माझ्या मतानें त्याचा संदर्भशुद्ध आणि श्रद्धेय अर्थ खालील तऱ्हेच्या शब्दघटित वाक्यानेंच नीट होईल.—"( परमेश्वरप्रवर्तित— ) लोकव्यवहारज्ञानाचा (वेद)त्रयी हा केवल उपसंहार किंवा हें केवल ( संरक्षक ) कवच होय" असाच अर्थ त्या बार्हस्पत्यमतविषयक सूत्रोत्तरार्धाचा ग्राह्यतम होय. ह्याप्रमाणें ही थोडीशी प्रथमाधिकरणांतील पहिल्या पहिल्या सूत्रांच्या भाषान्तराची चाचणी घेऊन झाल्यावर आतां पुढें पूर्वसंकल्पाप्रमाणें दहाव्या अध्यायाचें अथेति परीक्षण होत आहे.

३. चाणक्य, विष्णुगुप्त अथवा कौटिल्य हा जो या ग्रंथाचा कर्ता तो 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' किंवा 'श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्' ह्या तत्त्वाचा दृढश्रद्ध कडकडीत असा स्वधर्मनिष्ठ ब्राह्मण होता. त्याचा स्वभावपरिपोष करणें आणि शीलचित्र रंगविणें हीं कामें **मुद्राराक्षस-नाटककर्त्या** विशाखदत्तानें फारच उत्तम केलीं आहेत. स्वतः चाणक्यहि आपल्या या ग्रंथान्तीं—

**येन शस्त्रं च शास्त्रं च नंदराजगता च भूः ।**
**अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥**

अशी आपली--महाराष्ट्रराज्यस्थापक श्रीशिवाजीमहाराजांचें गुरु श्रीमद्रामदासस्वामी यांच्या दासबोधान्तर्गत 'आधीं केलें मग सांगितलें' याच प्रकाराची—स्वहस्ताक्षरमुद्रा करून आपलें यथास्थित शीलचित्रच वाचकांपुढें स्वतःच उभें करीत आहे. तेव्हां त्याचें तें शील आणि वैदिकाचाराविषयक श्रद्धा आणि तद्रक्षणाभिमान हीं लक्षांत ठेऊनच त्याचीं वचनें लाविलीं पाहिजेत. वरील त्याच्या अंत्यमुद्रांकित श्लोकांतील 'शस्त्रं च शास्त्रं च' या दोन पदांचा अर्थहि माझ्या मतानें **राजक्षत्रिय-वृत्ति** आणि **वैदिक--ब्राह्मणवृत्ति** असाच लक्षणा मानून करणें प्राप्त आहे. अर्थात् यथा राजा तथा प्रजा ह्या न्यायानें तृतीय द्विजवर्ण म्हणजे वैश्यवर्ण आणि सामान्यत्वें शूद्रान्त सर्वलोक आपोआपच आपापल्या आचारमर्यादेनें वागून

**व्यवस्थितार्यमर्यादः कृतवर्णाश्रमस्थितिः**
**त्रय्या हि रक्षितो लोकः प्रसीदति न सीदति ॥**

या त्रयीस्थापनाख्य तृतीयाध्यायांतील अन्त्यश्लोकार्धाप्रमाणें सर्व लोकांचें –राष्ट्राचें– कल्याणच होणार असा आर्यचाणक्याचा सिद्धांत आहे. आणि म्हणूनच आपल्या निदेस अनुसरून क्षत्रिय ब्राह्मणवर्णांचा हातोहात –त्वरित– उद्धार करूनच त्यानें 'इदं ( हें ) शास्त्रम् ( अर्थशास्त्र )' केलें, असाच त्याचा एकंदर अभिप्राय आहे. अस्तु !

४. आतां आपण मुख्य परीक्षणास योजिलेल्या दहाव्या अध्यायाकडे वळूं. तें करितांना प्रथम डाव्या हातास मूळ संस्कृत आणि उजव्या अंगास त्याचें प्रकाशित भाषान्तर *असा पुस्तकांतील उतारा करूं.

उपधाभिश्शौचाशौचज्ञानममात्यानाम् ।

अमात्यांच्या निष्ठेची परीक्षा.

मंत्रिपुरोहितसखः सामान्येष्वधिकरणेषु स्थापयित्वाऽमात्यानुपधाभिश्शौचयेत् ।

राजानें मंत्री व पुरोहित यांच्या स(सा)हाय्यानें सामान्य अधिकारांवर नेमलेल्या अधिकाऱ्यांची कपटप्रयोगानें परीक्षा करावी.

पुरोहितमयाज्ययाजनाध्यापने नियुक्तममृष्यमाणं राजा अवाक्षिपेत् ।

ज्याला वेदाधिकार नाहीं अशाला वेद पढविण्याला अथवा त्याचा (?) यज्ञ करण्याला राजानें पुरोहिताला आज्ञा करावी. ती आज्ञा मोडल्याचें निमित्त करून त्या पुरोहितास कामावरून दूर करावें.

स सत्रिभिश्शपथपूर्वमेकैकममात्यानुपजापयेत्—अधार्मिकोऽयं राजा साधुधार्मिकममन्यस्य (?) तत्कुलानमवरुद्धं कुल्यमेकप्रग्रहं सामंतमाटाविकमौपपादिकं वा प्रतिपादयामः। सर्वेषामेतद्रोचते कथं वा तवेति ।

मग त्या पुरोहितानें आपल्या खात्रीच्या हेरांकडून एकेक अमात्याला वितरविण्याचा प्रयत्न करून पहावा. अमात्यास हेरानें असें म्हणावें कीं, हा राजा धर्महीन आहे, म्हणून दुसरा कोणीतरी धार्मिक, कुलीन, त्याच्याच वंशांतील पूज्य (?) किंवा राजा होण्याला लायक असा एखादा मांडलीक किंवा अटवीपति किंवा पर्वतपति अशाला राजा करूं या. (हेरांनीं राजा करावयाचा !) इतर अमात्यांना हें कबूल आहे. तर तुमचें मत काय आहे (?).

प्रत्याख्याने शुचिरिति धर्मोपधा ।

यावर अमात्यानें जर नकार दिला तर तो स्वामिनिष्ठ समजावा. ही धार्मिक लोकांची (म्हणजे कर्तरि षष्ठी कीं कर्मणि ?) कसोटी झाली.

सेनापतिरसत्प्रग्रहेणावाक्षिप्तस्सत्रिभिरेकैकममात्यमुपजापयेल्लोभनीयेनार्थेन राजविनाशनाय-सर्वेषामेतद्रोचते कथं वा तवेति । प्रत्याख्याने शुचिरित्यर्थोपधा ।

अयोग्य इसमाला वर चढवून सेनापतीचा अपमान करावा आणि मग त्यानें (कोणी ? अपमान करणाऱ्या राजानेंच कीं काय ?) हेरामार्फत एकेक अमात्याला द्रव्याची लालूच दाखवून राजाचा नाश करण्याला प्रवृत्त करून पाहावें (राजानेंच ना ?). नाकबूल झाला तर कसोटीला उतरला. ही लोभी माणसांची परीक्षा. (हें सर्व वाक्य मराठी वाक्यरचनापद्धतीची प्राणान्तिक परीक्षा घेणारें आहे.)

परिव्राजिका लब्धविश्वासाऽन्तःपुरे कृतसत्कारा महामात्रमेकैकमुपजपेत् राजमहिषी त्वां कामयते कृतसमागमोपाया ; महानर्थश्च भविष्यतीति । प्रत्याख्याने शुचिरिति कामोपधा ।

जिचा अन्तःपुरांत सत्कार केला जातो अशा विश्वासुक स्त्रीनें अमात्यांस कळवावें कीं राणीची तुझ्यावर प्रीति जडली आहे. तुझी भेट होईल अशी मी युक्ति करतें. यांत तुला मोठी द्रव्यप्राप्तिहि होईल. हें निमंत्रण त्यानें नाकारलें तर तो शुद्ध समजावा. ही विषयी लोकांची परीक्षा झाली. (हा परिच्छेद तर पूर्वींच्याहूनहि वाक्यमीमांसापूर्वक अर्थचूर्णिकेस देण्यासारखा आहे.)

प्रवहणनिमित्तमेकोऽमात्यः सर्वानमात्यानावाहयेत् । तेनोद्वेगेन राजा तानवरुन्ध्यात् । का-

एका अमात्यानें इतरांना जलक्रीडेकरितां पाचारण करावें. हे सगळे एकत्र जमून कट करितात असा त्यांजवर आरोप ठेवून राजानें त्यांस बंदींत टाकावें. त्या ठिकाणीं पूर्वींच बंदींत ठेविलेल्या हेरानें

* भाषान्तराच्या उताऱ्यांतील अधोरेखण आणि कंसप्रश्नादि चिन्हें परीक्षकाची.

पटिकच्छात्रः पूर्वावरुद्धस्तेषाम-र्थमानावाक्षिप्तमेकैकममात्यमुप-जपेत्--असत्प्रवृत्तोऽयं राजा, सा-ध्वेनं हत्वा अन्यं प्रतिपादयामः, सर्वेषामेतद्रोचते कथं वा त-वेति ॥ प्रत्याख्याने शुचिरिति भयोपधा ॥

तत्र धर्मोपधाशुद्धान् धर्म-स्थीयकंटकशोधनेषु स्थापयेत् । अर्थोपधाशुद्धान् समाहर्तृसन्नि-धातृनिचयकर्मसु, कामोपधा-शुद्धान् बाह्यान्तरविहाररक्षा-सु । भयोपधाशुद्धानासन्नकार्येषु राज्ञः । सर्वोपधाशुद्धान्मंत्रिणः कुर्यात् । सर्वत्राशुचीन् खानिद्र-व्यहस्तिवनकर्मांतेषूपयोजयेत् ।

त्रिवर्गभयसंशुद्धा–
नमात्यान्स्वेषु कर्मसु ।
अधिकुर्याद्यथाशौच--
मित्याचार्या व्यवस्थिताः ॥
न त्वेव कुर्यादात्मानं
देवीवा लक्ष्मी(क्ष्मी)श्वरः।
शौचहेतोरमात्याना–
मेतत्कौटिल्यदर्शनम् ॥
न दूषणमदुष्टस्य
विषेणेवाम्भसश्चरेत् ।
कदाचिद्धि प्रदुष्टस्य
नाधिगम्येत भेषजम् ॥
कृता च कलुषाबुद्धि–
रुपधाभिश्चतुर्विधा ।
नागत्वान्तर्निवर्तेत
स्थिता सत्त्ववतां धृतौ ॥
तस्माद्वाह्यमधिष्ठानं
कृत्वा कार्ये चतुर्विधे ।
शौचाशौचममात्यानां
राजा मार्गेत सत्रिभिः ॥

इति विनयाधिकारिके उप-धाभिश्शौचाशौचज्ञानममा–त्यानां दशमोऽध्यायः ॥

त्यांस म्हणावें, हा राजा जुलमी आहे. याला मारून दुसरा न्यायी राजा गादीवर बसवूं. याविषयीं तुझें मन काय आहे. या कटांत जो अमात्य सामील होणार नाहीं तो राजनिष्ठ समजावा. ही भयपरीक्षा झाली. (हा परिच्छेद भाषान्तरात्मक नसून उत्तरार्धी मूळांतील वाक्यखंड सोडून दिलेला असा गाबाळ ग्रंथच आहे.)

याप्रमाणें कसोटी पाहिल्यावर जे धार्मिक कसोटीस उतरले असतील त्यांना न्यायखातें व पोलिसखातें यांवर नेमावें. लोभपरीक्षेंत जे उतरले असतील त्यांना करवसूली, खजिनदारी, उद्योगधंदे इत्यादि कामांवर नेमावें. विषयी लोकांच्या (ही षष्ठीहि कर्तरि, कर्मणि वा कसली?) कसोटींत जे पास झाले असतील त्यांना अन्तःपुर व स्त्रियांचीं विहारस्थानें यांच्या रक्षणाचें काम सांगावें. जे सर्वच कसोटीं(ट्यां)तून पार पडतील त्यांस मुख्य मंत्री करावें. जे कसो-टीला (कोणत्याच) टिकणार नाहींत त्यांना खाणी, जंगल वगैरे दूर-दूरच्या कामावर पाठवावें. धर्म, अर्थ, काम व भीति या चार प्रकारच्या कसोटींतून(?) अमात्यांना त्यांच्या लायकीप्रमाणें कामावर नेमावें, असें आचार्यांचें मत आहे. (आचार्य कोण ? कसोटींतून लायकीप्रमाणें कामावर म्हणजे काय ? कसोटी करण्याचें काम तर नव्हे ? )

कौटिल्य असा इशारा देतो कीं, राजानें अमात्यांची परीक्षा पहाण्याकरितां स्वतःवर किंवा राणीवर कसलाहि प्रयोग करण्याचें मनांत अणूं नये. पाण्यांत विष कालविल्याप्रमाणें दुष्ट माणसाच्या मनांत दुष्ट कल्पना भरवूं नयेत. कारण तो दुष्टपणा काढून टाक-ण्याला उपाय सांपडणार नाहीं. कपटामुळें (कोणाचें ?) कलुषित केलेली (कोणी ?) धैर्यवान् माणसांची बुद्धी (द्धि) आपला हेतु तडीस नेल्याखेरीज स्वस्थ बसणार नाहीं. म्हणून राजानें अमात्यांची बरी-वाईट परीक्षा हेरांच्या मार्फत परभारें दुसऱ्या कोणांवर तरी (हे दुसरे ते कोण ?) प्रयोग करून घ्यावी. (एकंदर पृष्ठ चार.)

सारांश, हे शेवटले दोन परिच्छेद तर व्याकरण आणि वाक्यमीमांसा यांस अनुसरून वाक्यपृथक्करण-प्रयोगानें तपासल्यास पुष्कळ अपूर्व अशीं नव तत्त्वें आढळणार आहेत आणि ती लेखनकला सोपी करून लेखाची स्पष्टार्थबोधकता वाढविण्यास अत्यंत उपयुक्त होतील, इतकेंच सुचवितों. अध्यायान्त दर्शविणाऱ्या 'इति'काराख्य वाक्याचा अर्थच झालेला नाहीं !

५. वरील भाषान्तरांत किंवा मराठी भाष्यांत अध्याय चवथ्याचा मथळा—अर्थशास्त्र व दंडनीति यांचा **विचार**–अथवा पांचव्यांतील ' आषोडशाद्वर्षात् ' या ठिकाणच्या भाष्यांतलि **सोळा वर्षेंपर्यंत** ह्यांत जशा उघडउघड चुका किंवा विपर्यास झाले आहेत तसेच प्रकार भरपूर आहेत. षोडश हा शब्द जेथें केवळ विशेषण असतो आणि संख्यावाचक विशेष्य किंवा सर्वनाम नसतो तेथें त्याचा अर्थ ' सोळावा ' असाच निश्चित होय. तो सोळा असा अनेकवचनी होत नाहीं. ' वर्षात् ' हेंहि पंचमीचें एकवचनच. सोळा वर्षेंपर्यंत ह्यांतील सोळा आणि वर्षे हें दोन्ही शब्द अनेकवचनी होत. सोळाव्या वर्षी आणि सोळा वर्षे ह्या दोन कालवाचक जोडशब्दप्रयोगांचे अर्थ परस्परांहून अत्यंत भिन्न आहेत. त्याचप्रमाणें 'सोळा वर्षेंपर्यंत ब्रम्हचर्य पाळावें' असा जो मराठी भाष्यांत वाक्यप्रयोग आहे त्यावरून निघणारी पुढील गोदान आणि विवाहकाल ह्यांच्या कालाची जी कमींत कमी मर्यादा ठरते तीहि तशी ठरवून देण्याचा किंवा सुचविण्याचा ग्रंथकर्त्याचा हेतु नाहीं. असें असूनहि आपल्या पूर्वीच्या, प्रस्तुत ग्रंथार्थ लावण्याचा यत्न करणारांची या आमच्या मराठी भाष्यकारांनीं प्रस्तावनापृष्ठ नवव्यावर जवळजवळ धुळवडच उडाविली आहे. परंतु ते पूर्वप्रयत्नीच बरोबर असून आमचे हेच चूक असल्यानें सूर्यावर थुंकणाराप्रमाणेंच ह्यांची अवस्था झाली आहे. पूर्वप्रयत्नींच्या ' शराबखानें ' आणि 'the honourable liquor-house' यांचा उपहास करणाऱ्या ह्या मराठी भाष्यभाषान्तरकारांनीं ५० व्या अध्यायांत **मारावयाचे बैल** (शांतं पापम् ! ) असेंहि एक भाषान्तर अत्यंत अनर्थावह केलेलें आढळतेंच ! क्षत्रियाचा उपनयनकाल सहाव्या वर्षापासून अकराव्यापर्यंत शास्त्र सांगतें. तेव्हां त्यास व्यक्तिनिष्ठ नित्यकर्मापुरतें वेदाध्ययन तीन वर्षांतहि सहज होऊं शकणारें आहे. आणि विशेषच ज्याला हवें असेल त्याला नऊ वर्षांचाहि अवधि आहे. त्याला लेखनवाचन आणि गणित ह्यांचें ज्ञान चौलापासूनच द्यावें असें याच ग्रंथांत पूर्वीच्या वाक्यांतच सांगितलें आहे. आमच्या मराठी भाष्यकारांच्या अर्थानें ह्या राजन्यक्षत्रियांच्या विवाहाचा काल अकरा अधिक सोळा म्हणजे वयाच्या सत्ताविस वर्षानंतरच योग्य असें ठरतें. हें भारत, रामायण किंवा इतर पुराणें आणि भारतोत्तरकालीनहि राजन्यक्षत्रियांच्या उपलब्ध इतिहासानें अगदीं एक सहस्रांशानेंहि समर्थनीय नाहीं. अशा आणखी अनेक चुका, नव्हे खिळे अथवा प्रमादविशेष, विवेचनास घेतलेल्या दहाव्या अध्यायापूर्वीच्या बहुतेक अध्यायांतून झालेले आहेतच. आणि त्या चुका पारिभाषिक शब्दांच्या सद्योऽपरिचयामुळें नसून साध्या शब्दांच्या विपरीतार्थदर्शनानेंच !

६. दहाव्या अध्यायाचें मराठी भाष्य करितांना काय किंवा केवळ वाचकानें आपली स्वमनोमय खरी खरी समजूत पाडून घेतांना मुख्यत्वें खालील मतें ध्यानांत घेतलीं पाहिजेत. दहाव्या अध्यायांत राजानें आपल्या निरनिराळ्या सामान्य अधिकाऱ्यांचा तो तो अधिकार चालविण्याची पात्रता पारखावयाची आहे. ती पारखतांना प्रारंभीं त्यानें विश्वासपात्र आणि राजनिष्ठ असे कट्टे स्वधर्मनिष्ठ मंत्री आणि पुरोहित हे दोन प्रकारचे प्रमुख अधिकारी मिळविले आहेत किंवा ते त्याला पूर्वपरंपरेनेंच प्राप्त झालेले असून आजच नव्यानेंच सर्व नेमावयाचे नाहींत. तथापि अनेक इतर अधिकारांवरून वरचेवर त्यास नवे नवे अधिकारी नेमण्याचा मात्र प्रसंग येणार आहे. त्यांतून मुख्य मंत्री म्हणजे मुख्यप्रधान आणि राजपुरोहित ही जोडी बहुतकरून, विशेषतः मुख्यपुरोहित तरी, कुलपरंपराप्राप्तच असतो. कारण तशी राजन्यक्षत्रियकुलांतील वर्णाश्रमधर्मव्यवहारतः चालच आहे. त्याचप्रमाणें मुख्य मंत्री म्हणजे प्रधान आणि सेनापति हे राजन्यक्षत्रियच असावयाचे असाहि पुरातन प्रघात दिसतो. ते सिंहासनाधिष्ठित राजकुलांतीलच असत. ही

गोष्ट इतिहासपुराणें निदर्शवीत आहेत. ग्रंथकार हा सनातनधर्मीय राजसंस्थेची --नुकतीच आणि प्रथमच नंदकुलानें आणि महावीरप्रणीत जैन आणि गौतमबुद्धप्रणीत बौद्ध धर्मानें विस्कळित केलेली--परंपरा फिरून स्थापावयाची प्रतिज्ञा करणारा आणि ती पुरी पाडणारा असा आहे. त्यानें आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या व त्यास स्वतः विद्यार्थी असतांना आणि पुढेंहि ग्रंथ करण्याच्या वेळीं उपलब्ध असणाऱ्या एतद्विषयक ग्रंथकारांच्या अभिप्रायांचा एकत्र संग्रह आणि आपलें निश्चित धोरण हीं आपल्या ह्या संग्रहसूत्रांत स्पष्ट दर्शवावयाचीं आहेत. म्हणून त्याच्या ह्या उपधाविषयक अध्यायांत ग्रंथकारमान्य सिद्धांत, तद्विरोधी पूर्वपक्ष आणि त्याचें हेतुपूर्वक खंडन असा क्रम आहे. त्या अनुरोधानें पाहिल्यास ह्याच चतुर्विधोपधासंग्राहक अध्यायाचें स्वरूप समजून त्याचें विभजन केल्यास हें एक चार प्रवेशकांचें नाटकच आहे. त्यांत अष्टवर्ग पात्रें आहेत. १ राजा, २ मंत्री, ३ पुरोहित, ४ राणी, ५ परिव्राजिका, ६ अमात्य, ७ सत्री आणि ८ कापटिकच्छात्र; ह्यांपैकीं पुढील चतुष्टयापैकीं परीक्ष्य जो एकेकटा अमात्य त्याच्याशीं परीक्षक कसोटी म्हणून, परिव्राजिका, २ सत्री आणि ३ कापटिकच्छात्र ह्या त्रिवर्गांतून कोणीतरी एकेकच, अशांचें कानमंत्र व्हावयाचे आहेत. कारण षट्कर्णी गेल्यास मंत्राचा भेद होतो ही सामान्य गोष्ट समंजसपणाचें गृहीत तत्त्व आणि मूलाधिष्ठानभूतच आहे. इतक्या गोष्टी लक्षांत ठेऊनच मूलसूत्रांचा अर्थ लाविला पाहिजे.

७. भाष्य करितांना १ मंत्रिपुरोहितसखः, २ स्थापयित्वा, ३ उपधाभिः, ४ शौचयेत्, ५ सत्रिभिः, ६ शपथपूर्वम्, ७ उपजापयेत्, ८ साधु, ९ एकग्रहम्, १० कुलम्, ११ औपपादिकम्, १२ असत्प्रग्रहेण, १३ विनाशनाय, १४ परिव्राजिका, १५ महामात्रम्, १६ महानर्थश्च, १७ कृतसमागमोपाया, १८ आवाहयेत्, १९ साधु, २० लक्ष्मीश्वरः आणि २१ योजयेत्, इतक्या शब्दांची व्याकरणशुद्ध निरुक्ति व्हावयाला हवी. ती मराठी भाष्यांत झालेली दिसत नाहीं. त्यामुळें सर्वांचे अर्थ चुकले आहेत—विपर्यस्त झाले आहेत.

८. दोन ठिकाणीं मुळांतच अपपाठ किंवा संशयपात्र पाठ आहेत. प्रथम साधु धार्मिकमन्यमस्य तत् या ठिकाणीं आणि द्वितीय –लक्ष्मीश्वरः– या ठिकाणीं. पैकीं दुसऱ्या ठिकाणीं मौद्रिकप्रमादहि असण्याचा संभव आहे. खरा पाठ 'लक्ष्मीश्वरः'च्या स्थलीं 'लक्ष्म् + ईश्वरः' = 'लक्ष्मीश्वरः' असा हवा. साधु-धार्मिक – या प्रथमस्थलीं साधु धार्मिक – अशीं असमस्त पदें असणारा एक पाठभेद आढळतो. आणि तोच ग्राह्यतर होय. आणखांहि 'राजविनाशनाय'च्या स्थलीं राजविनाशाय, 'कापटिकछात्र' येथें कापटिकश् छात्र असा असमस्तपद पाठ अशांहि पाठान्तरें उपलब्ध होतात. साधु हा शब्द उद्गारवाची अव्यय घेतल्यानें त्याचा अर्थ 'पुरें झालें ! नको नको (ह्याची संगति) ! (ह्या दुष्टापासून) दूर असणेंच बरें !' अशा प्रकारचा होतो आणि तोच ह्या ठिकाणीं उत्तम बसतो. शौचयेत्, आवाहयेत्, उपजापयेत्, हीं क्रियापदरूपें प्रयोजकभेदी आहेत. सत्रिभिः याचा अर्थ साग्निक गृहपति, अग्निहोत्री अर्थात् त्रैवर्णिकांपकीं स्वधर्मनिष्ठ गृहस्थाश्रमी नागरिक असाच होय आणि तोच ग्राह्यतम आणि येथें इष्ट आहे. राजा हा भूपति आणि वरील प्रकारचा नागरिक हा गृहपति. स्वधर्मनिष्ठ नागरिकांचें संरक्षणासाठींच आणि त्यांच्याच प्रार्थनेनें परमेश्वरानें राजसंस्था निर्माण केली आणि ती यथायोग्य चालवून घेणें हें त्या नागरिकांचें कर्तव्य होय अशीच परमेश्वराची वेदद्वारें आज्ञा आहे अशी सर्व सनातन वैदिकधर्मी चातुर्वर्ण्यघटित समाजाची श्रद्धा आहे. ह्याविषयीं तैत्तिरीयब्राह्मणांतील पंचाध्यायात्मक राज्याभिषेकप्रकरण पहावें. पाळया, हेर चार म्हणजे गूढपुरुष नांवाचा **वेषधारी** हा अजून ह्या ग्रंथांत उत्पन्न व्हावयाचा आहे. पुढील अकरा आणि बारा हे अध्याय त्याचाच विधि सांगत आहेत.

९. 'धार्मिकमन्यमस्य तत्कुलीनं' ह्या ठिकाणीं 'अस्य' च्या पुढें 'स्थाने' असें पद गणपतिशास्त्री आपल्या भाष्यांत पदरचें कल्पितात. तें त्यांचें करणें योग्य मानिलें तरी 'तत्कुलीनम्' ह्या पाठाची

दुष्टता नाहींशी होत नाहीं. माझ्या मतें तेथें 'एतत्कुलीनं' असें असावें. म्हणजे एकंदर पाठ 'धार्मिक-मन्यमेतत्कुलीनं' असा मानितां येईल. 'मेत' ह्या अक्षरद्वयाचें ठिकाणीं 'मस्य' असें अपवाचन आणि अपलेखन सहज होण्यासारखेंच आहे. प्रस्तुत निकटवर्तिवाचक दर्शकसर्वनाम 'एतत्' हेंच विद्यमान राजाच्या कुलाशीं संबंध दर्शविण्यास हवें. 'तत्' हें अप्रस्तुत दूरस्थवाचक दर्शकसर्वनाम गणपतिशास्त्री किंवा इतरहि भाष्यकारांच्या भाषान्तराशीं जुळत नाहीं. ह्या पूर्वप्रयत्नींचें भाष्य तर इष्टार्थतः बरोबर आहे. अर्थात् व्याकरणतः मी सुचविलेला पाठच शुद्धतम ठरला पाहिजे.

१०. परिव्राजिका-शब्दाचेंहि त्याचप्रमाणें 'लब्ध-विश्वासा' ह्या पदाचेंहि तात्पर्य भलतीकडेच लाविलें गेलें आहे. मराठी भाषान्तर केवळ स्त्रीशब्दानें झालें आहे तें उघडच चूक आहे. 'कृतसमागमो-पाया' हें राजमहिषीचें विशेषण आहे. भाषान्तरांत तें तसें वठलें नाहीं; तर त्या ठिकाणीं कांहीं तरी सावळा-गोंधळच झाला आहे. तोच प्रकार 'महामात्रम्' ह्या पदाचा आहे. महामात्र हा सामान्य अमात्य नव्हे. त्याहून भिन्न व उच्च आहे. महामात्राचें लक्षण मनुस्मृतींत पुढीलप्रमाणें आढळतें:—

**मंत्रे कर्मणि भूषायां वित्ते माने परिच्छदे ।**
**मात्रा च महती येषां महामात्रास्तु ते स्मृताः ॥ मनु० ९ । २५९.**

राज्यांतील उच्चाधिकारी, मुख्यप्रधान असे अर्थ या पदाचे आहेत. आणि तेच येथें इष्ट आहेत. महामात्रशब्दाशीं संबंधित असलेला 'महानर्थः' हा शब्दहि भाष्यभाषान्तरकारांनीं घेतलेल्या अर्थानें येथें योजिलेला मानणें म्हणजे अनुचित अर्थसंकोच करणेंच होय. महान् आणि अर्थः ह्यांचा प्रयोग येथें मोठा अत्यंत महत्वाचा असा मनोरथ, प्राप्तव्यार्थ, पुरुषार्थचतुष्टयापैकीं ऐहिक अभ्युदयपराकाष्ठा, असाच करणें योग्य आहे. कारण मंत्रे, कर्मणि, भूषायां, वित्ते, माने, परिच्छदे यस्य महती मात्रा पूर्वींच आहे अशा महामात्रास आपल्या असलेल्या स्थितीहून महदुत्कर्षकर स्थिति प्राप्त होण्याचेंच आमिष असेल तर तो राजमहिषीनें सुचविलेल्या अकर्मास प्रवृत्त होईल. नाहींतर सुतराम् तो तसें करणार नाहीं. म्हणून महा-मात्र आणि महानर्थ ह्या पदांचें स्वारस्य भाष्यभाषान्तरकारांस मुळींच कळलें नाहीं असें म्हणावें लागतें. अर्थशब्दाचे प्राथमिक अर्थहि द्रव्यात्मक नसून मनोरथात्मक, इच्छा, हेतु, संकल्प असेच आहेत. सामान्य अधिकारी जे अमात्य त्यांसंबंधीं वर 'लोभनीयेन अर्थेन' असें म्हटलें आहे तेथें मात्र द्रव्यात्मक अर्थ घेऊन चालेल.

११. **विनाशनाय** हें प्रयोजक आहे. त्याच्या जागीं विनाशाय असा जरी पाठभेद सांपडतो तरी तो दुर्बल होय. विनाशनाय हाच पाठ प्रबल आणि संदर्भशुद्ध होय. कारण सर्व अमात्यांनीं एक-मतानें कट करून सेनापत्यादिकांस राजघात करण्यास भाग पडावें असें करावयाचें आहे. कापटिकः छात्रः आणि औपपादिकं ह्या पदांचे अर्थहि असेच अनुचित झाले आहेत. छात्राचें लक्षण 'गुरोर्वैगुण्यावरणं शीलं यस्य सः' असें असावें लागतें. त्याच्यावर अप्रामाणिकपणाचा, खोटें बोलण्याचा, विपर्यास केल्याचा किंवा घातक मूर्खपणाचा आरोप येऊन जो अटकेंत पडलेला आहे असा त्या पदाचा अर्थ आहे. धंद्याचा हेर आणि तो लटोपटीनें तुरुंगांत बंदी ठेविलेला आहे असा नव्हे. त्याचप्रमाणें औपपादिकं म्हणजे पर्वतपीत, पर्वतेश्वर असाहि अर्थ नव्हे. कारण हा पर्वतेश्वर क्वचित् वर्णव्यवस्था न मानणाराहि नव्हे तर न मानणाराच असण्याचा अधिक संभव. तसाहि ग्राह्य अशी कल्पनाहि चाणक्यास शिवावयाची नाहीं. सारांश वर दाखविल्याप्रमाणें महत्त्वाच्या अशा पांचपंचवीस पदांचे अर्थ चुकले असल्यानें सर्वच भाषान्तर पावसाळ्याच्या आरंभीं चिखल कालविलेल्या महानदीच्या रेंदाड पाण्याप्रमाणें स्नानपानानर्ह झालें आहे. आज दोन अडीच महिने प्रतिदिनीं मननान्तीं तळीं बसणारा गाळ जो सांचला त्यासह आज त्याचें जें स्वरूप मजपाशीं आहे त्याचें थोडेसें दर्शन व्हावें या उद्देशानें हें लिखाण केलें आहे. इतकेंच येथें मध्यंतरींच सुचवीत आहें.

१२. प्रथमतः या दहाव्या अध्यायास मी चतुःप्रवेशात्मक एक नाटक म्हटलें आहे, त्याचा आणि सिद्धांत, पूर्वपक्षकथन, पूर्वपक्षखंडन आणि सिद्धांतमंडन असे जे चार प्रकार कल्पिले आहेत त्यांचाहि उकल करूनच हा लेख संपविणें भाग आहे. पहिल्या दोन उपधा मंत्री आणि पुरोहित ह्यांजकडून करवावयाच्या आहेत. त्यांत राजा किंवा राणी हीं उभयतां कोणाच्याच डोळ्यांवर यावयाचीं नाहींत; आणि असाच प्रकार उपधाप्रकरणीं नित्य असावा हा सिद्धांतपक्ष. आणि तोच चाणक्यमान्य. पुढील दोन प्रकारांत राणी आणि राजा अशीं अनुक्रमें उघड गोंविलीं जातात. तेव्हां ती तऱ्हा चाणक्यमतानें पूर्वपक्ष होय. म्हणून तिचा त्यानें—

न त्वेव कुर्यादात्मानं देवीं वा लक्ष्मीश्वरः।
शौचहेतोरमात्यानामेतत्कौटिल्यदर्शनम् ॥

असें म्हणून पूर्ण निषेध केला आहे; आणि आपण निषेध कां करतों हें समजावें म्हणून—

न दूषणमदुष्टस्य विषेणेवाम्भसश्चरेत् ।
कदाचिद्धि प्रदुष्टस्य नाधिगम्येत भेषजम् ॥
कृता च कलुषा बुद्धिरुपधाभिश्चतुर्विधा ॥
नागत्वा न निवर्तेत स्थिता सत्त्ववतां धृतौ ॥

असा सदृष्टान्त हेतुहि दिला आहे. आणि शेवटीं

तस्माद्बाह्यमधिष्ठानं कृत्वा कार्ये चतुर्विधे ।
शौचाशौचममात्यानां राजा मार्गेत सत्रिभिः ॥

असा त्यानें आपला एतद्विषयक सिद्धांत स्पष्ट शब्दांनीं ठासून सांगितला आहे. सर्व अध्यायाचा अर्थेति अर्थ लावतांना ह्या शेवटच्या श्लोकांतील कळसूत्राचाच उपयोग केला पाहिजे. अर्थात् जा जी कसोटी सामान्य अमात्यांच्या शौचाशौचज्ञानापेक्षेनें व्हावयाची ती ती बाह्यात्कारीं राजानें स्वसमान लेखिलेल्या पुरोहित आणि मंत्री ह्यांच्याकडून करवावयाची. त्यांनींहि ती आपण सुखवस्तु नागरिक असतांनाच करावयाची. मात्र आपल्या साहाय्यास इतर नागरिक घ्यावयाचे. मंत्री व पुरोहित यांस आज्ञाभंगाचे निमित्तानें राजानें कामावरून दूर करून घरीं बसवावयाचा बाहणा मात्र आपण करावयाचा. ह्या बाहण्यांतील रहस्य अमात्यांना किंवा इतरांहे सामान्य नागरिक अथवा प्रजाजन ह्यांस समजण्यास वावच ठेवावयाचा नाहीं.

ह्याप्रमाणें कौटिलीय अर्थशास्त्रपूर्वार्ध ह्या नवप्रकाशित ग्रंथाच्या मराठी भाष्यभाषान्तराची अल्पशी चाचणी आणि तिजबरोबर ओघानें दाखवितां येणारें त्या मूलग्रंथाचें स्वरूपांग मी यथामति ह्या लेखानें दाखविलें आहे. सर्व ग्रंथाचें स्वरूपाविष्करण करावयाचें तर असे किती तरी लेख लिहावे लागतील आणि ते यथावकाश संपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर अधिकारी लेखक लिहितीलहि. मलाहि आणखी कांहीं लिहितां आल्यास मीहि लिहीन. विशेषतः ह्या प्रथमाधिकरणांतीलच ११।१२ वे अध्याय आणि १८ वा अध्याय ह्यांतून जे 'ध' चा 'मा' असे प्रकार होऊन 'नारायण' वधा सारखे पातक जुडण्याचे प्रसंग झालेले आढळतात त्यांच्या परामर्शास्तव तरी एक स्वतंत्र लेख लिहावाच लागेल. मात्र आज येथेंच विराम करण्यापूर्वीं प्रकाशक आणि भाषान्तरकार ह्यांविषयीं कटु अनादरोक्ति जर क्वचित् निघाली असेल तर ती त्यांनीं मनावर घेऊं नये आणि मनुष्यसाधारण निष्कारण विकारवशता हा दोष मजमध्येंहि आहेच त्याकडे त्यांनीं क्षमेच्या डोळ्यांनींच पहावें अशी नम्र विनंति करीत आहें.

प्रवृत्त कशि गोवया दिसत लेखणी ब्राह्मणी ।
प्रभो वृषभवाहना उजळि तूंच ती या क्षणीं ॥
असोत इतरा शतावधि विधर्मदत्तापदा।
कुभाष्यविकृती तरी नच जडोत आम्हां कदा ॥ १ ॥

# अभिप्राय

**संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें** ( ले.–नी. शं. नवरे, बी. ए.(ऑनर्स), बी. टी., शिक्षक, नार्थकोट हायस्कूल, सोलापूर; मुद्रक व प्रकाशक,—वासुदेव गोपाळ परांजपे, आर्यसंस्कृति-मुद्रणालय, पुणें; मूल्य—चांगला कागद ८९, स्वस्त कागद ८७. )

उपरिनिर्दिष्ट पुस्तकांत शाकुंतल, विक्रमोर्वशीय, मृच्छकटिक, स्वप्नवासवदत्त, वेणीसंहार, मुद्राराक्षस आणि उत्तररामचरित या सहा सुप्रसिद्ध संस्कृत नाटककारांच्या सात नाटकांचीं कथानकें मराठींत गोष्टीरूपानें दिलीं आहेत. लेखकाच्या या कृतीची प्रशंसा चार प्रोफेसर, एक हेडमास्तर, एक संस्कृताध्यापक व एक मासिकाचे संपादक इतक्यांनीं निर्व्याज रीतीनें केली आहे. गोष्टींची भाषा, नीटनेटकी, गोड, आकर्षक, शुद्ध, भारदस्त, सोपी व रसपोषक असून गुंतागुंतीचें संविधानक थोडक्यांत सांगण्याचें असामान्य चातुर्य त्यांत प्रकट झालें आहे असा अभिप्राय या विद्वत्सप्तकानें दिला आहे तो आम्हांस सर्वांशीं मान्य आहे. वाङ्मयक्षेत्रांत रा. नवरे यांनीं प्रथमच पाऊल टाकलें आहे ही गोष्ट लक्ष्यांत घेतां त्यांना या गोष्टी इतक्या सुबक रीतीनें लिहितां आल्या हें त्यांस अत्यंत भूषणावह आहे. विद्याखात्यांत आपलें काम करीत असतां वाङ्मयसेवा करतां येते याचें उत्कृष्ट उदाहरण रा. नवरे यांनीं घालून दिलें आहे. त्यांचें अनुकरण त्यांचे साथीदार करतील अशी आम्हांस आशा आहे. विद्याखात्याला विद्येचें वावडें असल्यामुळें या खात्यांत साहित्यभक्त क्वचितच निर्माण होतो. म्हणून रा. नवऱ्यांनीं विद्याखात्याला आपल्या विद्याव्यासंगानें विटाळलेंच म्हणावयाचें. या पुस्तकावरून रा. नवरे हे पुढें उत्तम लेखक होतील असें भाकीत करण्यास मन धांवतें. रा. नवरे यांनीं आपला हा क्रम चालू ठेवावा. बाकीच्या नाटकांनाहि त्यांनीं असाच सुंदर वेष द्यावा. एकीकडे शिकवीत असतां दुसरीकडे ग्रंथरचना हातीं घ्यावी. सारांश, खात्याचेच सेवक बनून राहण्यांत संतुष्ट न राहतां विद्येचेहि सेवक बनण्याची महत्त्वाकांक्षा बाळगावी.

पुस्तकाची छपाई उत्तम आहे.

**ना. गो. चापेकर**

अनुक्रमणिका

# व्युत्पत्ति, शंका, चर्चा इत्यादि

## १

१. रा. वामन नारायण देशपांडे आणि त्यांचा "आद्य मराठी कवयित्री" महदंबिका इजसंबंधीं **विविधज्ञानविस्तारांतील** गेल्या वर्षाच्या जूनच्या अंकांतील प्रास्ताविक लेख-ह्यांत रा. देशपांडे यांनीं 'धवळे' हा शब्द संस्कृत धवल शब्दापासून व्युत्पादिला आहे. धवल शब्दाचा अर्थ पांढरा, सुंदर, स्वच्छ, शुद्ध असा विशेषणात्मक आणि **धवलः** पुंलिंगी नामार्थी पांढरा रंग, उत्तम बैल, दवळा नंदी आणि चीनकर्पूर (कापूर) असे पर्याय कोशांत आढळतात. ह्या दोन्ही प्रकारांच्या अर्थपर्यायांचा काव्याचा हा जो प्रकार आहे त्याशीं सरळ संबंध लागतेसें मला वाटत नाहीं. माझ्या मतें धव+ल=पति, प्रभु, यजमान+स्वार्थी ताद्धित प्रत्यय ल अशी व्युत्पत्ति ग्राह्यतर वाटते. धवला–ले अथवा दवळा–ळे असा पुंलिंगी शब्द ज्या काव्यप्रकारास लागतो तो काव्यप्रकार बहुधा विवाह–नायकवर्णनपर असून त्यांत त्या नायकाचेंच गुणवर्णन विशेषतः असतें असें आढळतें. लग्नप्रसंगीं वरवर्णनात्मक गाणीं गाण्याचा प्रघात आपल्या भरतवर्षात सर्व भारतीय जातींतून आजहि आढळतो. आणि त्यासच अनुसरून 'रुक्मिणीस्वयंवर' प्रसंग १६ वा यांतील "सभा बसली निजवेधें । ढवळे गाती स्वानंदें" ॥४६॥ ही एकनाथी ओंवी होय; आणि तीच रा. देशपांडे यांनीं दिलेली आहे.

२ याच लेखांत महदंबिकेनें वापरलेल्या 'पेरोज' सारख्या फार्शी शब्दांच्या पंक्तीस ज्ञानेश्वरींतील तेजी (घोडा) आणि पोतास (कापूर) ह्या शब्दांस बसवून आणखीहि असे शब्द ज्ञानेश्वरांनीं वापरले आहेत असा ध्वनि काढिला आहे. तेजस् ह्या शुद्ध संस्कृत शब्दार्थपर्यायांत अश्वजव, अश्ववेग यांचा अन्तर्भाव कोशकार दाखवितात. अर्थात् तेजस्+(तद्धित प्रत्यय इनच्) इन=तेजी हा शब्द फार्शी नव्हेच नव्हे. इन हा ताद्धितप्रत्यय स्वामित्वदर्शक आहे.

पोतासः हा शब्दहि संस्कृत कोशकार एक प्रकारचा कापूर ह्या अर्थानें देतातच. सारांश, पेरोजच्या पंक्तीस बसवून रा. देशपांडे यांनीं फार्शी ठरविलेले शब्द पोतास आणि तेजी हे शुद्ध संस्कृतोत्पन्न आहेत आणि ज्ञानेश्वरांची भाषा फार्शीसारख्या वैभाषिक शब्दांनीं अस्पृष्ट आहे हें निश्चित!

३ रा. देशपांडे यांनीं ढवळ्यांतील, कोणत्याही कोशांत न सांपडणाऱ्या, अशा ६०।५५ शब्दांची यादी दिली आहे; आणि ८।१० शब्दांपुढें प्रश्नच टाकून त्यांचा अर्थ लागत नाहीं असें सुचविलें आहे. सारांश, प्रश्नांकित शब्दांचें निर्वचन तर हवेंच हवें आणि ढवळ्यांतील इतरहि पुष्कळ शब्दांचें समाधानकारक निर्वचन व्हावयास पाहिजे असें मला वाटतें. तें जर कोणी करील तर बरें होईल.

४ 'विस्तारा'च्या चालू वर्षाच्या प्रथमांकांतील 'आमचा गांव' ह्या लेखांत कातकऱ्यांचा म्हणून 'आठवर' असा एक शब्द आढळतो. त्याची व्युत्पत्ति त्या लेखकानें–" अष्टवर्षा'पासून आठवर हा शब्द झाला असेल तर' इ. अशी संशयित केली आहे. आणि ती चिंत्यच खरी. हा आठवर शब्द शकाब्द ११९५-तील शिशुपालवधकाव्यांत आठुवर+पण असा सांपडतो. श्रीकृष्ण आणि रुक्मिणी ह्यांचा ह्या काव्यांत उभयतांच्या विवाहपूर्व निकटकालांतील स्थितीसंबंधीं उपरोधिक संवाद आहे. त्यांत कृष्णाच्या वयासंबंधीं रुक्मिणी म्हणते–

> **नुजवेचि कऱ्हणें बोलें: आंगां आठुवरपण आलें ॥**
> **तेह वेळीं नंदें लग्न लाविलें: तुलसींसीं ॥२०॥**

ह्या ओंवींत आंगां–अवयवांस आणि **आठुवरपण**=निवरपणा; म्हणजे "'घोडनवरा झाला होतास कृष्णा तूं' असें रुक्मिणी म्हणत आहे. श्रीकृष्ण रुक्मिणीहरणप्रसंगीं तिशी–निदान-पंचविशीचा तरी

होताच होता. आठवर किंवा आठुवर ह्या शब्दाचें निर्वचन खालीलप्रमाणें: अष्टिः = उपभोगसाधन असें शरीर, सोळांची संख्या, बीज, आठळी, मगज, खोबरें, असे अर्थ आहेत. वर ह्यांत धातु वृ. अष्टि-वर — अठिवर, अठवर, आठुवर. अशा रीतीनें हा शब्द आला आहे. सारांश अष्टवर्षाशीं आठवरचा कांहीं संबंध नाहीं आणि तो नवऱ्यासहि कातकरी लावतात ह्याचें आश्चर्य मानण्याचेंहि कारण उरत नाहीं.

५ दासबोधांतील पुष्कळ स्थळीं एखाददुसऱ्या शब्दांचे अर्थ अजून नीट लागलेले नाहींत. त्यामुळें पुष्कळच अवकाश संशोधनास आहे.

उदाहरणार्थ खालील एकच ओंवी येथें देण्यांत येत आहे.

**कांटीनें कांटी झाडावी। झाडावी परी ते कळों नेदावी॥**
**कळकटेपणाची पदवी। असों द्यावी॥ १२ द. १९ स. १०.**

धुळें येथें प्रामाणिक म्हणून छापिलेल्या प्रतींत ह्या ओंवीवर ६वी म्हणून दिलेली टीप अशी आहे:— "भांडखोरपणाची पदवी जेथल्या तेथेंच असूं द्यावी म्हणजे **भांडखोरपणा** करूं नये, असा अर्थ कित्येक करितात व कार्य करूनहि तें कोण करतो हें कळूं न देतां आपण आपल्याकडे **अजागळपणा** घ्यावा असा अर्थ कोणी करितात." (जाडा ठसा ह्या लेखकाचा.) सारांश, कळकटेपण किंवा कळकटेपण ह्या शब्दाचे अर्थ भांडखोरपणा किंवा अजागळपणा असे दोन परस्परविरुद्ध सुचविलेले दिसतात. स्वतः संपादक आपला निश्चितार्थ कांहींच देत नाहींत. सुचविले गेलेले दोन्ही पर्याय मला मान्य होत नाहींत. कारण त्यांपैकीं कोणत्यानेंहि मनाची समजूत होत नाहीं. मळमळ ही राहतेच. 'पदवी असों द्यावी' ह्या शब्दांचाहि उचितार्थ रहात नाहीं हें निराळेंच. माझ्या मतें कळक+टेपण असे दोन शब्द एकत्र होऊन कळकटेपण हा सामासिक प्रयोग येथें झाला आहे.

मळकट+पणा=मळकटपणा, पाणचट+पणा=पाणचटपणा, धुरकट+पणा=धुरकटपणा, गुळचट+पणा =गुळचटपणा ह्याप्रमाणें अकारान्त विशेषणास पण, पणा, हे प्रत्यय लागून होणाऱ्या भाववाचकांत विशेषणान्तींच्या आकाराचा एकार होत नाहीं. तेव्हां कळकटेपणा ह्यांतीलहि कळकट ह्या विशेषणाचें कळकटे असें रूप होऊं नये. ज्याअर्थीं तसें रूप येथें आहे त्याअर्थीं तो शब्द पण किंवा पणा ह्या प्रत्ययानें झालेला भाववाचक नाहीं. तो दोन स्वतंत्र नामांचा समास आहे. ती स्वतंत्र नामें कळक आणि टेपण हीं होत. टेपण हा शब्द संस्कृत टिप् ह्या धातूपासून व्युत्पाद्य आहे. टिप् आज्ञाकरणें, वाट—मार्ग दाखविणें, रोखणें इत्यादि. 'कांटीनें कांटी झाडावी' ह्यांतील करण आणि कर्म ज्या कांट्या ह्या दोहोंसहि आधार असणारा कळक हा 'झाडावी' ह्या कर्मणि क्रियेचा खरा कर्ता. ती त्याची पदवी मात्र त्यास असों-राहों—द्यावी हा सरळ अर्थ. पुढील चवदावी ओळहि 'पदवी' शब्द वापरीत आहे. आणि सेवकामध्यें आपली पदवी बळकटाचे व्हावीं असा तेथें प्रयोग आहे. अर्थात् ही पदवी धरणारा तो स्वामी, धनी, काम करविणारा आणि कांट्यांचा धनी कळकहि तोच होय. **ना. कृ. गद्रे.**

२

(१) अज्ञानदासाच्या अफझलखान आणि शिवाजी यांच्यावरील पोंवाड्यांत मस्तुती शब्द आला आहे त्याचा अर्थ काय असा एक इंग्लिश गृहस्थ पृच्छा करतात.

शब्द आला आहे ती ओळ अशी

संगात कुंजर मस्त हत्ती। घेतली झगड्याची **मस्तुती**॥

(२) कुलाबा जिल्ह्यांत अलीबागेजवळ नागांव म्हणून गांव आहे. तेथें इ. स. १३६७ सालचा यादवांच्या वेळचा एक शिलालेख आहे. तो मराठी असून भीमेश्वराच्या देवळाच्या पायऱ्यांवर आहे. त्यांत षष्ठीचे "जा" आणि "चा" असे दोन प्रत्यय वापरले आहेत. "चा" प्रत्यय आपल्या परिचयाचा आहे. पण "जा" अपरिचित दिसतो. श्रीरायाजा प्रधानु असे शब्द वरील शिलालेखांत आहेत. प्रो. गुण्यांनीं आपल्या तुलनात्मक भाषाशास्त्र या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत वरील शिलालेखाचा व "जा" प्रत्ययाचा उल्लेख केला आहे. "जा" प्रत्यय इतरत्र कोठें आला आहे काय?

वरील प्रश्नांचीं उत्तरें आमच्या वाचकांपैकीं कोणास माहीत असल्यास त्यांनीं कृपा करून कळवावीं.

**ना. गो. चापेकर**

### ३. सांप्रदायपरिमळ ग्रंथ कोणाचा–निरंजनाचा कीं निरंजनदासाचा ?

निरंजनकवी ऊर्फ वनाजी या पेशवाईकवीच्या मनोहर काव्याचे तीन खंड सुप्रसिद्ध महाराष्ट्रकाव्यपंडित रा. लक्ष्मणराव पांगारकर यांनीं अलीकडे प्रसिद्ध केले आहेत. तत्पूर्वी प्रथम निरंजनाचा ज्ञानेश्वरविजय नांवाचा गोड ग्रंथ चित्रशाळेकडून ( शके १८०१ ) मध्यें प्रसिद्ध झाला होता असें रा. पांगारकर लिहितात. शके १८०८ मध्यें पुणेंवर्णनकर्ते रा. गायकवाड यांनीं कवीचें चिद्बोधरामायण ( बालकांड ) प्रसिद्ध केलें होतें. पुढें रा. पांगारकरांस नाशिक क्षेत्रीं या कवीची बरीच अप्रकाशित कविता मिळाली. तिची माहिती त्यांनीं केसरींत ( शके १८२५ ) दिली होती. तोच लेख पुनः रा. पांगारकर यांनीं प्रसिद्ध केला आहे.

सांप्रत निरंजनमाधव-कवितासंग्रह खंड १ ला हा बी. ए. च्या परीक्षेस नेमिला आहे. या पहिल्या खंडांत **सांप्रदायपरिमळ** नांवाचा ग्रंथहि निरंजनाचा म्हणून जोडण्यांत आला आहे. कै. रा. भावे यांनीं महाराष्ट्रसारस्वतांतहि हा ग्रंथ याच कवीचा समजून माहिती दिली आहे. निरंजनाचें कांहीं लिखाण रा. भावे यांचे पाहाण्यांत आलें असावें असें दिसतें. अशा सर्व प्रख्यात व विद्वान् लेखकांनीं निःशंक मनानें सांप्रदायपरिमळ ग्रंथ निरंजनाचा समजून सर्व आपापली लेखरचना केलेली आहे.

परंतु हा सांप्रदायपरिमळ चिकित्सक बुद्धीनें वाचून पाहतां तो **निरंजनकृत नसून निरंजनदासकृत** असें स्पष्ट दिसून आलें म्हणून ही शंका अभ्यासी जनांचे पुढें ठेवीत आहे. रा. पांगारकर यांस शंका कळविली होती आणि त्यांचे कृपेनें थोडा वेळ त्यांचे जवळील निरंजन–कवितासंग्रहाचा कांहीं भागहि म्यां पाहिलेला आहे. रा. पांगारकर यांस माझी शंका पटली नाहीं असें ज्ञानप्रकाशांत नाशिक कॉलेजांतील त्यांचे व्याख्यानाचे वृत्तांतावरून कळतें. तेव्हां माझें म्हणणें सप्रमाण पुढें आलें म्हणजे त्यांत चूक असल्यास तेंहि सप्रमाण पुढें येईल. यास्तव हा प्रयत्न केला आहे.

सांप्रदायपरिमळ ग्रंथाचे पांच उद्गार म्हणजे भाग आहेत. ग्रंथ ओवीबद्ध आहे. फारच मधुर आहे. निरंजनाचें चरित्रहि परम मनोरम आहे. प्रत्यक्ष राजकारणांत तो वावरत असल्याचा पुरावा या ग्रंथांत आहे. असो. ग्रंथसंख्या सुमारें ९९२ आहे.

ग्रंथाचा बहुतेक भाग निरंजन व त्याची पत्नी गंगावती यांजमधील संवादानें भरलेली आहे. हा संवाद म्हणजे निरंजनानें स्वीकारलेल्या पारमार्थिक सांप्रदायाचा वृत्तांत आहे. प्रसंगानें थोडा कुलवृत्तांतहि यांत आहे. गंगावतीनें प्रश्न करावा आणि निरंजनानें उत्तर द्यावें अशी याची रचना आहे. आणि म्हणूनच हा स्वतः निरंजनानेंच लिहिला असावा अशी फसगत साहजिक होते. परंतु बारकाईनें अवलोकन केलें असतां हा भ्रम दूर होतो.

हा ग्रंथ निरंजनकृत नसून निरंजन**दास**कृत आहे याला **प्रमाणें ग्रंथांतच भरपूर** आहेत. प्रत्येक **उद्गाराचे अखेरीस** तसे **स्पष्ट व असंदिग्ध उल्लेख** आहेत. ते उल्लेख एकत्र देतोंः—

उद्गार पहिल्याची अखेरः—

ऐसें गंगावतीप्रती । योगी निरंजन स्वधर्म कथी । **दास** विनवी संताप्रती । महिमा पुढची परिसावी ॥ १५१॥

उद्गार दुसरा–अखेर :—

ऐसी निजसुंदरीप्रति । निरंजन योगी स्वकथा कथी । **दास** विनवी संताप्रती । श्रवणीं प्रीति असावी ॥ १९७ ॥

उद्गार तिसरा अखेर :—

ऐसें निरंजन निजसतीतें । कथन करी प्रेमें बहुतें । **दास** विनवी सज्जनातें । पुढें कथा परिसावी ॥ २६१ ॥

उद्गार चवथा, याची अखेर तर यापेक्षांहि अगदीं निःसंदेह खात्री पटविणारी आहे:—-

इतिश्री निरंजनदासविरचित सांदायपरिमळ महाग्रंथ । येथें षट्पद साधुसंत । रमतां तृप्ती घडेल ॥१६४॥

पांचव्यांत तर संशयच ठेवला नाहीं. तेथें निरंजनाला स्पष्ट गुरू म्हणून नमस्कार करून समाप्ति केली आहे. त्या ओंव्या येणेंप्रमाणें:——

नमोनमो सद्गुरुमूर्ती । नमो नमो पावनकीर्ती । नमो नमो चित्सुखस्फूर्ती । देवोनि दासा सांभाळीं ॥२१७॥ श्रीनिरंजन नमो नमो निर्गुणरूपा । नमो नमो ज्ञानदीपा । नमो नमो करोनि कृपा। पददासां सांभाळीं ॥२१८॥ निरंजनदासरचित । सांप्रदायपरिमळ महाग्रंथ । आजि पूर्ण होतां यथास्थित । सद्गुरुचरणीं अर्पिला ॥२१९॥

याप्रमाणें हे अंत्योल्लेख असून त्यांवरून अगदीं स्वच्छ अनुमान निघतें कीं सांप्रदायपरिमळ-कर्ता निरंजन हा नसून त्याचा शिष्य निरंजनदास हा आहे.

या दृष्टीनें पाहिलें म्हणजे ग्रंथांतच आणखीहि प्रमाणें मिळतात. आरंभीं सुरवातीलाच मोघम रीतीनें गुरुनमन करून पुढें शिष्य ( म्हणजे निरंजनदास ) म्हणतो "स्वामी शिष्यकुळें बहुतें । देखो येतीं आकुलचित्तें । सद्गुरु सांप्रदाय कळावयातें । आर्त धरिती म्हणौनि ॥७॥" यासाठीं "म्हणौनि कृपावचनीं मातें । आज्ञा करावी महामहंतें । सांप्रदायपरिमळ ग्रंथातें । रचावया करुणाब्धी ॥१४॥" मग "एवं विनवितां सद्गुरुचरणीं । मान्य करोनि माझी दीनवाणी । म्हणती अवश्य शिष्यमणी । कीर्तिमळ प्रकटवीं ॥१५॥

अशी गुर्वनुज्ञा मिळाली तेव्हां नमोनि स्तवोनि अत्यादर । युक्त परिमळ प्रकाशवी ॥२२॥ असा ग्रंथरचनेचा इतिहास सप्रयोजन ग्रंथारंभींच कर्त्यानें लिहिला आहे आणि मग तेथून पुढें

"निरंजनयोगी समाधिविरामीं । स्वानुभव सुखानंद परमीं । रमोनि असतां चिद्घनधामीं । गंगा नमी पादपद्मा ॥ अशा शब्दांनीं निरंजनगंगासंवादास प्रारंभ केला आहे.

ग्रंथकार स्वतःचें व्यक्तित्व निरंजनाहून वेगळें असल्याचें अगदींच झांकून ठेवीत नाहीं. चवथ्या उदाहरणाचे प्रारंभीं तो स्वच्छच तृतीयपुरुषीं कथनास प्रारंभ करीत आहे:–

दास म्हणे संतीं । ऐकावी कथा पावन अति । पुसे भावें गंगावती । निरंजना सांप्रदाय ॥१॥

परिमळांतील या व इतर उल्लेखांवरून (१) दास (२) गंगावती (३) निरंजन अशा तीन व्यक्ति अगदीं 'भिन्न' असून दास हा निरंजनगंगावतीसंवादरूपानें स्वसद्गुरुसांप्रदाय कथन करीत आहे यांत कांहीं एक संशय नाहीं.

निरंजनाचा पिता कोण ? ह्या प्रश्नाबद्दल दोन अक्षरें येथें लिहिलीं पाहिजेत. रा. पांगारकर व भावे या पित्याचें नांव महादो वनाजी देतात आणि रा. भावे तर वनाजी हें आडनांव असावें असा तर्क सुचवितात ! यावर मला इतकेंच म्हणावयाचें कीं निरंजनाचा पिता महादो वनाजी नव्हे. त्याच्या पित्याचें नांव माधव तिमाजी आणि तिमाजीचा पिता महादो वनाजी म्हणजे महादो वनाजी हा निरंजनाचा बाप नसून पणजा होय. ही सर्व हकीकत सांप्रदायपरिमळ उद्गार पहिला, ओंवी ५४ ते ९१, येथवर अगदीं स्पष्ट आहे.

परंतु १९०३(इ. स.)चाच लेख रा. पांगारकर यांनीं कायम ठेवल्यामुळें त्या वेळीं घाईनें किंवा गैरसमजुतीनें जी चूक राहिली ती अद्यापि तशीच राहून गेली यापेक्षां विशेष नाहीं. पुनः हा ग्रंथ व वरील ओळी वाचतां व त्यांस व कोणासहि संशय राहणार नाहीं. आज येथेंच थांबतों.

फा. व. ३० । १८४९, पुणें.

दत्तो वामन पोतदार.

# डॉ. सन्यत्सेन काय म्हणतो ?

## ( एका इंग्रजी ग्रंथाचा गोषवारा. )

लेखक. श्री. ना. गो. चाफेकर.



चीन देशांत राज्यक्रांति करून लोकशाहीची स्थापना करणारा डॉ. सन्यत्सेन यानें सन १९२४ सालीं चिनी भाषेंत आपल्या देशबांधवांसमोर जीं व्याख्यानें दिलीं त्यांचें फ्रँक प्राइस साहेबांनीं केलेलें इंग्रजी भाषांतर नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. डॉ. सन्यत्सेनसारख्या विद्वान् व कर्त्या मुत्सद्याचे विचार मराठी वाचकांस समजावे म्हणून या उत्कृष्ट व महत्त्वाच्या पुस्तकाचा सारांश आम्ही देत आहों.

या पुस्तकाचें नांव सॅन मिन च्युइ असें असून तीन लोकतत्त्वें असा त्याचा अर्थ आहे. तीन तत्त्वें म्हणजे राष्ट्रानें मनन करण्याजोग्या तीन महत्त्वाच्या बाबी. डॉ. सन्यत्सेन यांचे हे तीन सिद्धांतच होत. प्रत्येकावर सहा सहा व्याख्यानें देण्याचें त्यानें योजिलें होतें व त्याप्रमाणें त्यानें सोळा व्याख्यानें दिलीं. शेवटल्या विषयावर चार व्याख्यानें झाल्यावर सहा सात महिन्यांच्या आंतच तो मृत्युवश झाला. त्यामुळें शेवटला विषय अपुरा राहिला आहे. राष्ट्रीयत्व, लोकसत्ता आणि लोकधारणा हे ते तीन विषय होत.

## राष्ट्रीयत्व.

### व्याख्यान पहिलें.

चिनी लोकांना राष्ट्रहिताची कळकळ वाटत नाहीं. कुटुंबाचा व कुळीचा त्यांना अभिमान असतो. कुटुंबाकरतां किंवा कुळीकरतां वाटेल तो स्वार्थत्याग ते करतील पण राष्ट्राबद्दल ते बेफिकीर असतात. चिनांत प्रायः एकाच जातीचे लोक असल्यामुळें जात किंवा राष्ट्र आणि राज्य यांतील भेद येथें भासत नाहीं. पण राष्ट्राहून राज्य निराळें. राज्याची वाढ युद्धानें अथवा बलात्कारानें होत असते पण राष्ट्राची वा जातीची वाढ नैसर्गिक कारणांनीं होते. एका राज्यांत अनेक जातींचे लोक असूं शकतात. याचें मोठें उदाहरण ग्रेटब्रिटनचें होय. मनुष्याचे निरनिराळे समाज पृथ्वीच्या पाठीवर दृष्टीस पडतात. त्यांच्या वाढीचीं मुख्य कारणें म्हणजे एक पिंड, एक धंदा, एक भाषा, एक धर्म आणि एक आचार हीं होत पीतवर्णी चिनी लोकांत एकच रक्त खेळत आहे. निरनिराळ्या मार्गांनें लोक उपजीविका करूं लागले म्हणजे त्यांच्यांत भिन्नता उत्पन्न होते. एका जातीचे लोक दुसऱ्या जातीच्या लोकांची भाषा बोलूं लागले म्हणजे ते दुसऱ्या जातींत समाविष्ट होतात. आपण परकीयांची भाषा शिकलों तर परकी लोक आपणांस सहज आत्मसात् करून टाकतील. राज्य गेलें असतांहि केवळ एक धर्मामुळें तग धरून असलेले लोक म्हणजे ज्यू व हिंदू होत. समान चालीरीति असलेले लोक लवकरच एकजीव झाल्याविना रहात नाहींत. सारांश; वरील सारख्या स्वाभाविक कारणांनीं बनत जातें तें राष्ट्र आणि जबरदस्तीनें अस्तित्वांत येतें तें राज्य.

आजतागाईत जुने नवे समाज टिकून राहिले त्या कारणांचा विचार करतां चिनी लोकांचा लोप होऊं नये अशी इच्छा असल्यास आपल्यामध्यें राष्ट्रीय बुद्धि जागृत झाली पाहिजे. आपण चाळीस कोटी लोक व आपली संस्कृति चार हजार वर्षांची असें असून इतर राष्ट्रें आपणांस तुच्छ लेखतात. उलट चिमकुल्या जपान राष्ट्रापुढें मान तुकवतात याचें कारण आपणांमध्यें राष्ट्रीय भावना नाहीं. आपल्या

कुळीची, जातीची कोणी निर्भर्त्सना केली तर आपणांस राग येतो, पण राष्ट्राला फासण्या लागल्या तरी त्याचें आपणांस कांहींच वाटत नाहीं. अँग्लो सॅक्सन लोक फक्त ३८००००००; शंभर वर्षांपूर्वी तर ते १२००००००च होते. पण आज जगभर त्यांनीं अवाढव्य राज्य स्थापन केलें आहे. जपानचा कित्ता आपण गिरविला पाहिजे. जपानच्या उदाहरणावरून असें दिसतें कीं, निरनिराळ्या लोकांत वर्णभेद असला तरी बुद्धि किंवा हुशारी यांत फारसा फरक नसतो. रशिअन लोक सोळा कोटीच आहेत. महायुद्ध चालू असतांच त्यांनीं जुलमी राज्यपद्धतीचा धुव्वा उडवून समाजसत्ता स्थापन केली. युरोपांतील सर्व राष्ट्रांना आतां रशियाची भीति वाटत आहे. कारण आजचा रशिया सर्व जगांतील साम्राज्यवादी व भांडवलवाले यांचें समूल उच्चाटण करूं पहात आहे. आजचा रशिया न्यायाचें साम्राज्य स्थापूं पहातो, दुर्बलांना हात देऊं इच्छितो व जबरदस्तांना पायबंद घालण्यास प्रवृत्त होतो. याच कारणास्तव लहान राष्ट्रें रशियाचें स्वागत करीत आहेत. रशियाच्या उत्तेजनानें तुर्की लोकांनीं अल्पावधींत आपली उन्नति करून घेतली. याच्यापुढें, ज्यांना अन्याय व जुल्म सहन करावा लागत आहे अशीं सर्व राष्ट्रें जुल्माचा व अन्यायाचा प्रतिकार करण्यांत एकवटतील अशीं चिन्हें दिसत आहेत.

गेल्या शतकांत निरनिराळ्या देशांची लोकसंख्या खालील प्रमाणांत वाढली आहे. अमेरिका शेंकडा १०००, इंग्लंड ३००, जपान ३००, रशिया ४००, जर्मनी २५०, फ्रान्स २५ ह्या वाढीचा परिणाम चीन देशावर काय होईल हा विचार मनांत आला कीं मला भीतिच वाटते. चीनची लोकसंख्या गेल्या दोनशें वर्षांत वाढण्याच्या ऐवजीं घटतच चालली आहे. ४० कोटींवरून ३० कोटींवर आली आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. असाच क्रम चालू राहिल्यास शंभर वर्षांनीं अमेरिका आपणांस अनायासानें गिळंकृत करील. म्हणून मालथसचें तत्त्वज्ञान बाजूस सारून आपली संख्या वाढेल असेंच धोरण आपण ठेवलें पाहिजे. मूठभर मंचू व मोंगल लोकांनीं चीन देश जिंकून बहुसंख्याक चिनी लोकांना आपले गुलाम बनविण्याचा प्रयत्न केला. परराष्ट्रांनीं चीन देश कधीं काळीं जिंकल्यास बहुसंख्याक लोकांची अल्पसंख्याक लोकांवर ही घोरपड पडेल आणि मग गुलाम म्हणून सुद्धां आपली त्यांना गरज पडणार नाहीं.

## व्याख्यान दुसरें.

लोकसंख्येची वाढ किंवा घट नैसर्गिक कारणांनीं होते. पण राष्ट्रांचे उदयास्त यांना वाढ व घट बऱ्याच अंशानें कारणीभूत होतात. आजपर्यंत आपला व आपल्या संस्कृतीचा नाश झाला नाहीं हें खरें. पण या पुढें ही अशीच स्थिति राहील हें म्हणणें सयुक्तिक होणार नाही. निसर्गशक्तीप्रमाणें मानवी शक्ती ही समाजावर अम्मल करीत असते. मनुष्याची उत्क्रांति ही या दोनही शक्तींचें फलित होय. पुष्कळ वेळां तर मानवी शक्ती निसर्गाचें कांहीं एक चालू देत नाहीं राजकीय व आर्थिक हिकमती योजून मनुष्य अनुकूल निसर्गाला हाणून पाडतो. मंचू व मोंगल वंशाच्या लोकांनीं आपणांस जिंकलें खरें पण ते लोक इतके थोडे होते कीं आपल्यांतच जिरून गेले; म्हणून चिनी वंशाचे लोक अबाधित राहिले. पण अर्वाचीन बलिष्ठ राष्ट्रांनीं उत्पन्न केलेली परिस्थिति अननुभूत आहे राजकीय व आर्थिक अशी दुहेरी बिकट परिस्थिति तसेंच इतर राष्ट्रांची जीववाढ यांच्याशीं अतःपर चीन देशाला झगडावें लागेल. आज शंभर वर्षें हा देश परकीयांच्या राजकीय वर्चस्वाखालीं आहे. त्याच्या पूर्वी इंग्लंड हिंदुस्थान जिंकण्यांत गुंतलें होतें म्हणून त्यानें चीनकडे दुर्लक्ष्य केलें. कारण हिंदुस्थानांत चीन संकट उत्पन्न करील अशी त्यास भीति वाटली. युरोपियन राष्ट्रांना चीन देश आपसांत वाटून घेण्याची हांव होती पण येथें बंड झाल्यापासून त्यांनीं तो विचार सोडून दिला. बंडामुळें चिनी लोकांत अद्यापि जीव आहे असें त्यांस वाटूं लागलें. व मंचूराजांवर उलटणारे लोक आपल्यावरहि उलटतील अशी त्यांस स्वाभाविक भीति पडली. म्हणून आतां ते सैन्याच्या जोरावर आर्थिक वर्चस्व प्रस्थापूं पहातात. राजकीय पारतंत्र्य एकवेळ पतकरेल पण आर्थिक

पारतंत्र्य परवडणार नाहीं. तें फार भयंकर: कारण त्याचे दुष्परिणाम उघड व तावडतोब दिसत नाहींत. आर्थिक पारतंत्र्य अव्यक्त असतें.

चीनबरोबर व्यापार करण्याचा इंग्लंडनें घाट घातला, कुरापत काढून भांडण उपस्थित केलें व चिनी बादशहाकडून भरपाई मागण्यांत आली. बादशहाजवळ पैसे नव्हते तेव्हां अर्थातच त्यानें बंदरावरची जकात वसूल करण्याचा हक्क इंग्रजांच्या स्वाधीन केला. त्याला असें वाटत होतें कीं अशा रीतीनें इंग्लंडची फेड लवकर होणार नाहीं ! पण बादशाही अंमल किती दुबळा होता याचें प्रत्यंतर त्याला लवकरच आलें. इंग्रजांनीं आपले अंमलदार नेमून जकातीचें उत्पन्न वाढविलें. स्वदेशी उद्योगधंदे वुर्डाविणाऱ्या वाढत्या परराष्ट्रीय व्यापाराला इतर राष्ट्रें आयात मालावर जबरदस्त जकात बसवून आळा घालतात. अमेरिकेनें असेंच केलें. त्यावेळीं अमेरिका शेतकऱ्यांचेंच राष्ट्र होतें व युरोपिअन राष्ट्रांनीं उद्योगधंदे वाढविले होते. निरनिराळ्या देशांत मालाच्या किंमतीवर शेंकडा पन्नास किंवा साठ टक्के जकात सामान्यतः बसविण्यांत येते. इतकी जकात बसवावी तेव्हां बाहेरून माल येण्याचें बंद पडून देशी धंद्यांना उत्तेजन मिळतें. परदेशांशीं व्यापारी संबंध येण्याच्या अगोदर चीन देशांत कापड तयार होत असे. पुरुषानें नांगरावें आणि बायकोनें विणावें अशी आपल्यांत म्हणच आहे. पण सध्यां परकी कापड स्वस्त मिळत असल्यामुळें देशी कापडाचा धंदा बसला. जकातीची बाब परकीयांच्या हातांत. ते आयात कापडावर कमी जकात बसवतात. चिनी कापडाच्या निर्गतीवर जबरदस्त जकात ठेवतात, इतकेंच नव्हे तर देशांतल्यादेशांत खपणाऱ्या देशी कापडावरहि जकात आहेच. सारांश, संरक्षक जकात बसविण्याचें बाजूसच राहिलें; उलट विदेशी मालाच्या उत्तेजनार्थ आपल्याच मालावर जकात आपण बसवितों असें होतें. चीन देशाचा व्यापार म्हणजे निर्गतापेक्षां आयात अधिक. स. १९२१ सालीं पन्नास कोटी डॉलर किंमतीचा माल या देशांत अधिक आला.

समुद्रावरील व्यापाराप्रमाणें परकीयांनीं या देशांत स्थापलेल्या पेढ्या आपणांस नागवीत आहेत. आपल्या लोकांचा विश्वास देशी पेढ्यांपेक्षां या पेढ्यांवर अधिक. त्यांनीं व्याज कमी दिलें तरी चालतें. त्यांची पत किती आहे याची चौकशीहि कोणी करीत नाहीं. आपलेच पैसे कमी व्याजानें घेऊन अधिक व्याजानें लावतात व अशा रीतीनें नुसते इकडील पैसे तिकडे करून लाखों रुपये नफा मिळवतात. इतका पैसा आपण आपल्या हातचा दवडतों. स. १९११ सालीं बंडाच्या वेळेस राजघराण्यांतील माणसांनीं व इतरांनीं मिळून बारा अब्ज डॉलर परकोयांच्या पेढ्यांत ठेव म्हणून ठेवले याचें व्याज मिळण्याच्या ऐवजीं त्यांनीं पेढीवाल्यांनाच त्यांनीं सांगितलें तें भाडें दिलें. पेढ्याप्रमाणें मालाची ने आण करणाऱ्या बोटीसुद्धां परकीयांच्या; त्यामुळें वाहतूकहि त्यांसच मिळते. याशिवाय व्यक्तिशः व संघशः व्यापार करणारे असंख्य लोक आहेत; त्यांच्या नफ्याची रक्कमहि कोटींवर जाईल. तात्पर्य, आपण संख्येनें कमी होत चाललों आहों हें फार वाईट. रक्तवर्ण अमेरिकन नष्ट झाले. आपली स्थिति पुढें मागें तशीच होईल. राजकीय विपरीत परिस्थितीमुळें आपण आपला पुष्कळ मुलूख घालवून बसलोंच आहों आणि आर्थिक परिस्थिति आपणांस भिकेला लावीत आहे. भविष्यकाळ चांगला यावा म्हणून यांतून आपण रस्ता काढला पाहिजे.

## व्याख्यान तिसरें.

परकी लोकांनीं चीन देश जिंकल्यामुळें शेंकडों वर्षे चिनी लोक राष्ट्रीयत्व गमावून बसले आहेत. कारण एका लोकांनीं दुसऱ्या लोकांनीं जिंकलें म्हणजे जेते जितांची स्वतंत्र विचारशक्ति चुरडून टाकतात. मंचूबादशाही बुडवण्याच्या हेतूनें बंड उभारलें तेव्हां आपल्यांतीलच शहाणेसुरते लोक बंडवाल्यांच्या विरुद्ध लिहूं बोलूं लागले आणि मंचू बादशहांची स्तुति करण्यांत धन्यता मानूं लागले. लोकांतील देशाभिमान गाडून टाकण्याचा मंचूंनीं अटोकाट प्रयत्न केला. देशाभिमान नष्ट होण्याचें दुसरें कारण म्हणजे विश्वबंधु-

त्याची कल्पना आमच्या तरुणांनीं उचलून धरली. ही कल्पना राष्ट्रीयत्वाला अतिशय घातक आहे. साम्राज्याच्या विस्ताराकरतां पाश्चात्य राष्ट्रें या कल्पनेचा फैलाव करतात. परंतु आपणांस ती मारक आहे; देशाभिमानच आपणांला तारील; विश्वाभिमान बुडवील.

## व्याख्यान चौथें

जगांतील लोकसंख्या हल्लीं सुमारें दीड अब्ज आहे. त्यापैकीं एक चतुर्थांश लोक चीन देशांत रहातात. म्हणजे प्रत्येक चार माणसांत एक माणूस चिनी आहे. जगांतील गौरकाय लोकहि चाळीस कोटी आहेत. यांच्यांतहि चार जाती आहेत. त्या लॅटिन, ट्युटॉनिक, अँग्लोसॅक्सन व स्लाव. यांचीं मोठ-मोठीं राज्यें आहेत. यांना युरोप खंड पुरत नाहींसें झाल्यामुळें अमेरिका, आस्ट्रेलिया, आशिया या खंडांत त्यांनीं शिरकाव केला व तेथेंहि राज्यें स्थापिलीं. या लोकांत तीव्र राष्ट्रीय भावना प्रदीप्त झालेली आहे. लहानशा ब्रिटिश बेटांतील अँग्लोसाक्सन लोक आज इतरांपेक्षां जगांतील अधिक क्षेत्र व्यापून बसले आहेत. महायुद्धाच्या पूर्वी साम्राज्याच्या हांवेनें सर्वांस पछाडलें होतें. जबरस्तीनें दुसरे देश पादाक्रांत करण्याची इच्छा हीच साम्राज्यहांव. महायुद्धाचें कारण म्हणजे दोन सम्राटांची महत्त्वाकांक्षा. समुद्रावर आपलें वर्चस्व पाहिजे व स्वाभ्युदयार्थ अधिक मुलूख हस्तगत केला पाहिजे एतदर्थ इंग्लंड व जर्मनी ह्यांच्यांत चुरस लागली व त्याचमुळें युद्धाचा वणवा पेटला. चार वर्षें पर्यंत चाळीस ते पन्नास कोटी लोक युद्धांत गुंतले होते. युद्ध ऐन रंगांत असतांना आपल्या जातभाईकडे असलेल्या स्वाभाविक ओढ्यानें अमेरिका युद्धांत सामील झाली व त्यामुळें युद्धाचा शेवट झाला. अमेरिका मध्यें पडली नसती तर इंग्लंडचें साम्राज्य नष्ट झालें असतें. प्रेसिडेंट विलसनच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानें पराकित राष्ट्रें हुरळून गेलीं व त्यांनीं आपल्या सम्राटांना आनंदानें मदत केली. पण युद्ध संपल्यावर स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला इंग्लंड आदि करून जेतीं राष्ट्रें हरताळ फासूं लागलीं. अखेर असा चमत्कार दिसून आला कीं स्वयंनिर्णयाच्या ऐवजीं लहान व परांकित राष्ट्रांवर अधिक जुलूम सोसण्याची पाळी आली. नाहीं म्हणावयाला रशियाची राज्य-क्रांति हीच एक चांगली गोष्ट या युद्धांतून निष्पन्न झाली. रशियन लोकांनीं प्रथम आपल्या पादशाहीचें उच्चाटण केलें, आणि नाडलेल्या राष्ट्रांना मदत करण्याचें व्रत अंगीकारलें. त्यामुळें या राष्ट्रांत पुनः आशातंतु उत्पन्न झाला. जगांतील दीड अब्ज लोकांपैकीं चाळीस कोटी गोरे लोक बाकीच्या लोकांस खाऊन टाकण्यास प्रवृत्त झाले आहेत. अमेरिकेंतील मूळ रक्तवर्ण लोकांचा नायनाट झाला. काळ्या आफ्रिकन लोकांचा लवकरच संहार होईल. हिंदुस्थानांतील तांबूस वर्णाच्या लोकांना क्षय लागलाच आहे. आणि आशियांतील पिवळे लोक थोडक्याच काळांत रसातळास जातील अशीं चिन्हें दिसत आहेत. पण आतां पंधराकोटी रशियन लोक चाळीसकोटी गोऱ्यांतून फुटले. तेव्हां आतां पंचवीस कोटीच पीडक राहिले. पण ते फौजेच्या जोरावर व आसुरी उपाय योजून बाकीच्या सवाशें कोटी लोकांना आपल्या लगामीं आणण्याची पराकाष्ठा करीत आहेत. यापुढें पंचवीसकोटी एका बाजूला आणि सवाशेंकोटी दुसऱ्या बाजूला असा देखावा दृष्टीस पडेल. पंचवीस कोटी लोक संख्येनें कमी असले तरी त्यांचें लष्करी सामर्थ्य मोठें आहे. लष्करी शक्ति अपुरी पडेल तेथें ते आर्थिक पेच उत्पन्न करतात. युरोपांतील राष्ट्रें लेनिनला शिव्याशाप देतात. याचें कारण हेंच कीं सवाशेंकोटी लोकांना पंचवीस कोटि लोक नाडतात ही गोष्ट त्यानें उघडपणें बोलून दाखविली. या अन्यायांतून मानव जातीची सुटका करण्याकरतां आपण चाळीस-कोटी चिनी लोकांनीं आपली राष्ट्रीय भावना जागृत केली पाहिजे. ही जागृत झाली तर त्याचा परिणाम काय होईल हें गोरे लोक ओळखून आहेत. म्हणूनच त्यांनीं विश्वबंधुत्वाचें तत्त्व पुढें केलें. पण अगोदर राष्ट्रीयबुद्धि दृढमूल झाल्याशिवाय विश्वबंधुत्व आपणांस साधणारच नाहीं. साम्राज्याची कल्पना चीन देशाला माहीत नव्हती असें नाहीं. चिनी साम्राज्य पुष्कळ काळ होतें. पण तें स्वार्थप्रेरित अथवा दुष्ट-

पणाचें नव्हतें. लहान राष्ट्रें आपण होऊन चीनला खंडणी देत व चीनचें मांडलिकत्व आनंदानें पत्करीत. युद्धानें प्रांत काबीज करणें हें रानटीपणाचें लक्षण आपण मानीत आलों. युरप पासून राजकीय तत्त्वज्ञान शिकण्याची आपणांस गरज नाहीं. युरप पासून जर कांहीं आपणांस शिकावयाचें असेल तर आधिभौतिक शास्त्रांतील शोध होत.

### व्याख्यान पांचवें.

पूर्वी आपण मंचूंचे गुलाम होतों. आतां सर्व राष्ट्रांचे गुलाम बनलों आहों. आणि याचें कारण राष्ट्रीयत्वाचा अभाव होय. म्हणून राष्ट्रीय भावना जागृत झाली पाहिजे; आणि ही भावना जागृत करण्याचा उपाय म्हणजे आपण हल्लीं कोणत्या स्थितींत आहों हें लोकांना पटवून देणें. आपला समूळ नाश होण्याची वेळ आली आहे हें लोकांना समजलें पाहिजे म्हणजेच ते कृति करण्यास तयार होतील. समजून होणें कठीण असतें. कृति होणें सोपें आहे. आपल्या देशावर कोणतीं संकटें आहेत हें प्रत्येकास समजलें पाहिजे. जपान, अमेरिका, फ्रान्स व इंग्लंड आपणांस खाण्यास टपून बसलीं आहेत. त्यांना तें मुळींच कठीण नाही. पण त्यामुळें आपसांत दुही माजेल या भीतीनें हीं सर्व राष्ट्रें अजून स्वस्थ आहेत. कोणत्याही एका राष्ट्राला बाकीचीं राष्ट्रें चीन देश पचूं देणार नाहींत. चीनचे तुकडे पाडून ते वाटून घेतांना आपआपसांत भांडणें जुंपल्या शिवाय रहाणार नाहींत. एवढ्याच करतां आपण अद्यापि जिवंत आहोंत. जपानला तीस लाख सैन्य चीनवर पाठवतां येईल. अमेरिकेंत तर सर्वांना शाळांतून व कालेजांतून लष्करी शिक्षण दिलें जातें प्राथमिक शिक्षण तर मुलामुलींना सक्तीचें आहे. अमेरिकेचें खडें सैन्य थोडें असलें तरी प्रसंग पडल्यास वाटेल तितकें सैन्य उभें करतां येतें. तथापि प्रत्यक्ष युद्धाच्या फंदांत कोणी पडणार नाहीं हें खरें. कारस्थानें करून व हिकमती लढवून आपला मतलब हीं राष्ट्रें साधतील. आर्थिक वर्चस्व बसवून आपणांस वरील राष्ट्रें शरण येण्यास भाग पाडतील. आपल्या व्यापाराची स्थिति सध्यां अशी आहे कीं आपण चाळीस कोटी लोक माणशीं साडेसात डालर कर देत आहों. बायका वगळल्या तर हा कर माणशीं पंधरा डालर होईल. पण पुरुषांतही मुलगे व म्हातारे द्रव्योत्पादनाच्या कामीं निरुपयोगी म्हणून बाजूस सारले तर बाकीच्या सुमारें दोन तृतीयांश मध्यम वयाच्या कर्त्या लोकांवर हा सर्व बोजा पडतो. अर्थात् प्रत्येक कर्त्या माणसाला पंचेचाळीस डालर परकीयांना दिले पाहिजेत असें होतें. हा बोजा वाढतच जाणार. हा भयंकर प्रकार नाहीं काय ? ही आर्थिक परिस्थिति आपण ओळखली पाहिजे.

या नंतर इतर राष्ट्रांची लोकसंख्या वाढत आहे व आपली घटत आहे ही गोष्टहि आपल्या मूळावरच बसली आहे. कारण बहुसंख्याकांपुढें अल्पसंख्याक लोक टिकत नाहींत, ऱ्हास पावतात असा अनुभव आहे. आपल्याच देशाकडे पहा. चिनी ( हॅन ) लोक या देशांत आल्यावर येथील मूळच्या जाती लुप्त झाल्या. हीं सर्व ऱ्हासाचीं कारणें आपणांस समजलीं म्हणजे राष्ट्रीय भावना आपणांत उत्पन्न होईल. पाश्चात्य लोकांत व्यक्ति हाच समाजाचा घटक आहे. आपणांत कुटुंब अथवा जात हीं समाजाच्या घटकस्थानीं आहेत. व्यक्तीपेक्षां जातीमध्यें राष्ट्रीय भावना उत्पन्न करणें सुगम पडेल. चिनी लोकांची गोत्रें शंभरच आहेत असें समजतात. एकाच कुळींत निरनिराळ्या पूर्वजांना पूज्यत्व प्राप्त झालें म्हणून हीं गोत्रें थोडीं वाढलीं. तथापि आज सुद्धां चारशेंवर गोत्रें अथवा आडनांवें आपणांत नाहींत. चाळीस कोटी घटकांवर राष्ट्रीयत्वाचा संस्कार घडण्यास विलंब लागेल. चारशें घटकांवर तो अल्पकाळांत होईल. चिनी माणूस आपल्या जातीची इभ्रत जाऊं न देण्याविषयीं दक्ष असतो. पण राज्य बुडालें तरी त्याची शांति यत्किंचितहि ढळत नाहीं. राज्यावर कोण आहे याची तो चौकशी करीत नाहीं. सरकारसारा भरला म्हणजे झालें. ही वृत्ति आपण घालविली पाहिजे. जातीजातींमधलीं भांडणें न भांडतां सर्वांनीं मिळून परकीयांना तोंड दिलें पाहिजे. आपणांस अन्याय सहन करावा लागत आहे. अतःपर आपण हा अन्याय चालूं देणार नाहीं व त्यासाठीं राष्ट्रीय भावनेनें प्रेरित होऊन आपणांत ऐक्य झालें पाहिजे हें जर

आमच्या लोकांस समजेल तर परकीयांना तोंड देण्याचा मार्ग आपणांस काढतां येईल. परंतु हल्लींच्या स्थितींत तोंड देणें आपणांस शक्य नाहीं. कारण आपणांत जूट नाहीं. जूट असती तर प्रतिकार करणें सोपें गेलें असतें. उ. हिंदुस्थानावर ब्रिटिशांची पूर्ण सत्ता आहे. राजकीय जाचाचा प्रतिकार करणें हिंदी लोकांच्या आटोक्याबाहेर आहे. तथापि गांधींच्या असहकारितेनें आर्थिक दडपण ते दूर करूं पहात आहेत. असहकारिता म्हणजे अशी कीं ब्रिटिशांना जें पाहिजे असेल तें हिंदी लोक देत नाहींत व ब्रिटिश जें पुढें करतील तें ते घेत नाहींत. उदाहरणार्थ, एखाद्या ब्रिटिश माणसाला कामकरी पाहिजे असेल तर हिंदी मनुष्य त्याच्या करतां काम करणार नाहीं. इंग्लिश लोक हिंदी लोकांना सर्व प्रकारचा माल पुरवतील; पण ते तो न घेतां देशी माल घेतील. गांधींनीं असहकारिता पुकारली तेव्हां ब्रिटिश लोकांना त्याचें महत्त्व वाटलें नाहीं व गांधींकडे त्यांनीं दुर्लक्ष्य केलें. परंतु सर्व देशभर जेव्हां का असहकारितेचा पुरस्कार करणाऱ्या मंडळ्या स्थापन झाल्या तेव्हां त्यांनीं गांधीला तुरुंगांत टाकलें. हिंदुस्थानाला जें करतां आलें तें आपल्याला कां करतां येऊं नये ? परकी सत्तेला विरोध करण्याला दोनच मार्ग आहेत. लोकांत राष्ट्रीय-भाव जागृत करणें तसेंच लोकसत्ता व लोकधारणा हे प्रश्न सोडविणें हा एक उपाय. दुसरा मार्ग म्हटला म्हणजे असहकारिता आणि सत्याग्रह हाच होय.

## व्याख्यान सहावें.

प्राचीन काळीं चीन देश वैभवाच्या शिखराला जाऊन पोंचला होता. तोच चीन आज सर्व राष्ट्रांचा गुलाम बनला आहे. आपण गमावलेलें नांव पुनः मिळविलें पाहिजे. लष्करी जोरावर राज्यविस्तार करतां येईल, पण राष्ट्र किंवा राज्य यांचा लौकिक व मोठेपणा कायम ठेवावयाचा असेल तर नैतिक गुण अवश्य आहेत. चिनी लोकांत पूर्वी हे गुण होते. तेच आतां आपल्या अंगांत पुनः वाणतील असें केलें पाहिजे. आपल्या ठिकाणीं निष्ठा पाहिजे. पूर्वी स्वामिभक्ति हा मोठा गुण आपल्यामध्यें होता. आतां राष्ट्रभक्ति हा मोठा गुण पाहिजे. पितृभक्ति जर आपणांत संचार करील तर सर्व सार्वजनिक कामें आपणांस योग्य रीतीनें करतां येतील. प्रामाणिकपणाविषयीं आपली अद्यापिहि ख्याति आहे. मोठमोठ्या व्यवहारांत चिनी माणसांच्या नुसत्या शब्दावर परकी लोक विश्वास ठेवितात, लेखी करार करून मागत नाहींत. आपल्या लोकांची न्यायप्रियताहि दांडगी आहे. आम्हीं आपल्या वैभवाच्या दिवसांत कोणत्याहि राष्ट्राचा समूळ उच्छेद केला नाहीं. इतर राष्ट्रांची न्यायप्रियता स्वार्थी असते. उ. जपान घ्या. माझ्या एका जपानी स्नेह्याबरोबर संभाषण करतांना तो म्हणाला, जपाननें महायुद्धांत इंग्लंडला जर्मनी विरुद्ध मदत करणें मला स्वतःला पसंत नव्हतें. पण दोन राष्ट्रांत झालेल्या तहामुळें जपानला केवळ वचनभंग होऊं नये म्हणून युद्धांत पडावें लागलें. मीं लगेच त्यास विचारलें चीन व जपान यांच्या दरम्यान शिमोनोसेकीचा तह झाला नव्हता काय ? त्यांत कोरियाचें स्वातंत्र्य राखलेंच पाहिजे अशी शर्त नव्हती काय ? असें असून कोरिया गिळंकृत करून जपाननें तो तह मोडला नाहीं काय ? मग इंग्लंडबरोबर झालेल्या करारावद्दल इतकी काळजी कां ? चीन देश दुर्बल आहे आणि इंग्लंड बलिष्ठ आहे म्हणूनच ना ? असो. याशिवाय, सलोखा, दया, प्रेम व शांतता हेहि गुण चिनी लोकांत आहेत. पण ज्याला शिष्टाचार किंवा सभ्यता म्हणतात तो आपल्यांत मुळींच नाहीं. चार चौघांत कसें वागावें हें आपणांस समजत नाहीं. वारा सरणें, हाताचीं नखें वाढविणें यांसारख्या गोष्टी आपण सोडल्या पाहिजेत. त्यामुळें परकीयांचें मत आपल्याविषयीं वाईट होतें. नैतिक गुणांप्रमाणें बुद्धिमत्तेंतहि चिनी लोक कमी नाहींत. बंदुकीची दारु, छापण्याची कला, कंपास, रेशीम, चहा, झुलते पूल, चिनी माती इत्यादिकांचे शोध आपणच लावले आहेत. आतां पाश्चात्यांचे अगदीं अलीकडील शोध आपण उचलले पाहिजेत. त्यांचें शास्त्रीय ज्ञान व त्यांची संशोधनपद्धति आपण घेतली पाहिजे. अशा रीतीनें आपण स्वतः सामर्थ्यवान झाल्यावर दुर्बल राष्ट्रांना तारण्याचें कार्य आपण आपल्यापुढें ध्येयरूपानें ठेविलें पाहिजे.

# लोकसत्ता.

## व्याख्यान पहिलें.

लोकसत्ता या विषयाला मी आज प्रारंभ करीत आहें. "लोक" ही संज्ञा संघटित मनुष्यांना लावतात. राज्यकारभाराची लगाम हातीं येणें याचें नांव सत्ता. राज्यकारभार लोकतंत्र झाला म्हणजे लोकसत्ता स्थापित झाली. लोकसत्ता कशाकरतां पाहिजे हें आपणांस समजलें पाहिजे. विचारांतीं असें दिसतें कीं मनुष्यजातीचें अस्तित्व राखलें जावें एतदर्थ मानवी प्रयत्न सारखे चालू आहेत. संरक्षण व निर्वाह हीं दोन अंगें या प्रयत्नाचीं आहेत. पण मनुष्याप्रमाणें जनावरेंहि आत्मसंरक्षणार्थ प्रयत्न करीत असतातच. म्हणून मनुष्याचा जनावराशीं विरोध येतो व लढा सुरू होतो. अशा रीतीनें जगाच्या आरंभापासून मनुष्याला सारखें लढावें लागत आहे. रानटी प्राण्यांबरोबर लढतांना शरीरबलावांचून माणसा-जवळ दुसरें साधन नव्हतें. सर्प व क्रूर श्वापदें यांचा संहार करण्याकरतां माणसांना एकजूट करणें प्राप्त झालें. त्यांचा उच्छेद करून मनुष्यांना स्वतः हात पाय पसरण्यास अवसर मिळाला. मनुष्यें समाज करून निर्भयतेनें राहूं लागलीं. सुधारणा होऊं लागल्या. पुढें मनुष्याला निसर्गाबरोबर झगडावें लागलें. पूर, आग, वादळ, वीज यांच्यापासून मनुष्यांना उपद्रव होऊं लागला. व ही आपत्ती टाळण्याचें त्यांच्या अटोक्याबाहेरचें होतें. अशा वेळीं देव, दैवी सामर्थ्य, भक्ति, उपासना, धर्म वगैरे अस्तित्वांत आलीं. धर्माधिपत्त्व व लोकाधिपत्त्व एकाच ठिकाणीं यामुळें नांदूं लागलें. यानंतर अशा राजांची सत्ता शूर योद्धे व राजकारणपटु लोक हिसकावून घेऊं लागले. आतां माणसामाणसांत युद्ध जुंपलें कारण केवळ धर्मश्रद्धेनें संरक्षण होत नाहीं असें लोकांनीं ओळखलें. लष्करी सामर्थ्य व शहाणपणाचा राज्यकारभार यांवांचून परशत्रूपासून रक्षण होणें कठीण ही खूणगांठ लोकांनीं बांधली. हें मनुष्यामनुष्या-मधील युद्ध इतिहासाच्या आरंभापासून चाललेलेंच आहे. राज्य ही खासगी मत्ता असें राजे समजूं लागले. मी राजा आहें म्हणून माझेंच राज्य आहे असें चौदावा लुई उघड म्हणत असे. हीं सर्व भांडणें अथवा लढे राजाराजांमध्यें, आणि दोन निरनिराळ्या लोकसमूहांत होत. आतां राजा आणि त्याची प्रजा यांच्यांतच भांडणें सुरू झालीं आहेत. हाच लोकसत्तेचा काळ होय. चिनीलोक बुद्धिमान् आहेत तसेच कर्तृत्ववान् आहेत त्यामुळें लोकसत्ताक राज्यपद्धतीला ते पात्र आहेत. अमेरिकन व युरोपियन-लोक आम्ही अपात्र आहों असें म्हणतात व त्यांचीच री आमचे विद्वान् ओढतात, पण त्यांनीं चीनचा इतिहास वाचला नाहीं. एकसत्ताक राज्यपद्धतीच येथें जरी होती तरी लोकसत्ताकपद्धतीची कल्पना लोकांना ज्ञात होती. युरोपमध्यें मुद्दां लोकसत्ताक राज्यपद्धति अगदीं अलीकडचीच आहे. फ्रान्सच्या राज्यक्रांती पासून लोकसत्तेला रंग चढूं लागला. मीं राजा होईन ही महत्त्वाकांक्षा सफल करण्याचें सामर्थ्य ज्याच्यांत असेल त्यानें उठावें आणि राज्य घ्यावें असें आजपर्यंत होत गेलें. हें टाळण्या करितां हें राज्य-पद चाळीस कोटी लोकांना मिळेल असें आम्हीं आतां ठरविलें आहे.

## व्याख्यान दुसरें

युरोपमध्यें लोकांना राजां पासून फार जुलूम सहन करावा लागत असे. भाषणाची बंदी व हालचाली-वर निर्बंध या कैचींत ते लोक होते म्हणून स्वातंत्र्याच्या निशाणाखालीं सर्व लोक जमले. स्वातंत्र्य हें फ्रेंच राज्यक्रांतिकारांचें ध्येय होतें. आपली स्थिति तशी नाहीं. आपणांस व्यक्तिशः मुबलक स्वातंत्र्य आहे. आपले राजे आपली गादी संभाळीत. त्यांच्या गादीच्या आड कोणी आला नाहीं कीं ते कोणाला त्रास देत नसत. म्हणूनच सामान्य चिनी माणूस राजा कोण आहे याची चौकशीहि करीत नसे. ठरलेला कर दिला म्हणजे स्वच्छंदपणें त्यास वागतां येई. म्हणून स्वातंत्र्य पुकारलें असतां कोणाच्याही हृदयाला

त्यानें चटका बसणार नाहीं. आपणांस फाजील स्वातंत्र्य आहे. स्वातंत्र्याच्या पुरस्कारानें आपण उच्छृंखल मात्र बनूं. आपलें सांप्रतचें स्वातंत्र्य उलटें कमी केलें पाहिजे. स्वातंत्र्य व्यक्तीला नव्हे देशाला पाहिजे. राष्ट्र पूर्णपणें स्वतंत्र पाहिजे. व्यक्ति नियंत्रितच पाहिजे. प्रत्येक राज्यक्रांतीचे उद्देश निरनिराळे असतात. प्रजास्वातंत्र्य हा फ्रेंच राज्यक्रांतीचा उद्देश होता तर राष्ट्रस्वातंत्र्य हा अमेरिकन राज्यक्रांतीचा उद्देश होता. राष्ट्रीय भावना, लोकसत्ता व लोकधारणा हें आपल्या राज्यक्रांतीचें ध्येय आम्हीं फार विचार करून ठरविलें आहे. कारण आपणांमध्यें या तिहींचा आज अभाव आहे. आपण दरिद्री आहों आपली वैयक्तिक परतंत्रता भासण्यासारखी नाहीं. म्हणून राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरतां एकेजुटीनें आपण झटूं या.

## व्याख्यान तिसरें.

स्वातंत्र्य, समता व बंधुभाव हें फ्रेंच राज्यक्रांतीचें ब्रीदवाक्य होतें. व्यक्तिस्वातंत्र्याच्या जागीं आमच्या क्रांतिकारक पक्षाच्या ब्रीद वाक्यांत राष्ट्रीयत्व असून समतेच्या जागीं लोकसत्ता हें तत्त्व आहे. मनुष्यांना उपजत स्वातंत्र्य नाहीं तशीच त्यांच्यांत स्वाभाविक समता पण नाहीं. युरोपियनांचा हा समज चुकीचा आहे. जगांत दोन वस्तु सारख्या कोठेंच नसतात. परमेश्वराची तशी योजनाच नाहीं. युरोपमध्यें राजांनीं आपल्या कृतीनें मनुष्यांतील स्वाभाविक विषमता खालवरच्या पदव्यांनीं अधिकच भेसूर केली. त्यामुळें कांहीं काळ म्हणजे राजे व उमराव यांचें वर्चस्व झुगारलें जाईपर्यंत स्वातंत्र्य व समता या शब्दांना लोक भुलले व क्रांति यशस्वी झाली. पण मग लोक गोंधळले. स्वाभाविक समता नाहीं असें आतां कोठें नुकतें लोकांना पटूं लागलें आहे. महात्मा, सात्विक वृत्तीचा, शहाणा, बुद्धिमान, सामान्य बुद्धीचा, मूर्ख व नादान या सर्वांना एकाच सुतांत गोवून खोटी समता स्थापित करणें वेडेपण होय. सर्वांना आपली कर्तृत्वशक्ति उपयोगांत आणण्याची सारखी संधि मिळावी हें मात्र वाजवी आहे. समता म्हणजे राजकीय दृष्ट्या सर्व मनुष्यें सारखीं आहेत असें मानणें इतकेंच. युरोपमध्यें पदव्या, सरदाऱ्या व धंदे आनुवंशिक होते. लेकानें बापाचाच धंदा केला पाहिजे अशी स्थिति होती. पण चीन देशांत असें कांहीं नव्हतें. एक राज्यपद कायतें पिढीजाद. बाकी पिढीजाद असें कांहीं नाहीं. आजपर्यंत तीन राज्यक्रांत्या झाल्या. त्यांत इंग्लंडचा प्रयत्न फसलाच. कारण तेथें अद्यापि राजा व उमराव पिढीजाद आहेत. नंतर इंग्लंडनें अमेरिकन लोकांना बरोबरीच्या नात्यानें वागविलें नाहीं म्हणून स्वातंत्र्याकरतां युद्ध करून अमेरिका स्वतंत्र झाली. जगणें, स्वतंत्रता, व सुखाकरतां वाटेल तो धंदा करणें हे मनुष्याचे कधीं नष्ट करतां न येणारे असे हक्क आहेत हें अमेरिकन लोकांनीं आपल्या घटनेंत लिहिलें. पण पुढें अमेरिकन लोकांचें वर्तन निग्रोशीं याच्या उलट होऊं लागलें तेव्हां लिंकननें पुन. युद्ध करून निग्रोंना गुलामगिरींतून मुक्त केलें. या नंतर फ्रेंच राज्यक्रांति झाली. पण फ्रेंच लोकांनीं समतेच्या तत्त्वाचा दुरुपयोग केला. आपण आंधळेपणानें युरोपचें अनुकरण करूं नये. लोकसत्ता प्राप्त झाल्याशिवाय आपणांस खरें स्वातंत्र्य व समता लाभणार नाहींत. लोकसत्तेवरच हीं अवलंबून असतात. म्हणून आधीं लोकसत्ता व मग स्वातंत्र्य आणि समता. समतेच्या मूर्खपणाच्या कल्पनेमुळें युरोपमध्यें अद्यापि लोकसत्ता स्थापित झाली नाहीं. अद्यापि मजूर व भांडवलवाले यांमध्यें तंटे आहेतच. मजूर लोकांच्या हातांत संप करण्याचें हत्यार असतें. पण सर्व लोक सारखे आहेत म्हणजे सारख्याच बुद्धीचे आहेत अशा भलत्याच कल्पनेमुळें त्यांना शहाणपणाचें पुढारीपण लाभत नाहीं. आमचा पोटापाण्याचा प्रश्न आहे. आम्हांला राजकारणाशीं कांहीं कर्तव्य नाहीं असें येथील मजूर म्हणतात. पण हा मूर्खपणा आहे. राजकारण व आर्थिककारण यांचा निकट संबंध आहे. राजकारणाकडे दुर्लक्ष्य केल्यास तुमचा पोटापाण्याचा प्रश्न कसा सुटणार ? ज्यांना बुद्धि नाहीं त्यांनीं ज्यांना ती आहे त्यांचा उपयोग करून घेतलाच पाहिजे. खरी समता म्हणजे प्रत्येकानें आपआपल्या शक्तीप्रमाणें राष्ट्राची सेवा करणें.

## व्याख्यान चौथें.

युरोप व अमेरिका येथील प्रजासत्ताक राज्यपद्धतीनें लोकांच्या पदरांत राजकीय हक्कांचें पुरें माप अद्यापि पडलें नाहीं. राजे पदभ्रष्ट झाले खरे पण लोकसत्तेचें तत्व प्रत्यक्ष अमलांत किती आणावयाचें याविषयीं मतभेद होऊं लागला. अमेरिका स्वतंत्र झाल्याबरोबर वॉशिंग्टनच्या दोन चिटणिसांत मतभेद झाला. जेफरसनच्या मतें सर्व मनुष्यें सारखींच लायक, सद्गुणी व हुशार आहेत त्यामुळें कोणाला कोणताहि अधिकार दिला तरी योग्यच होईल. याच्या उलट हामिल्टनचें असें म्हणणें होतें कीं एक मनुष्य दुसऱ्या सारखा नाहीं; चांगलीं माणसें आहेत तशीं वाईट आहेत. वाईट माणसांच्या हातांत राज्यकारभार दिला तर पूर्वीचे राजे बरे म्हणावे लागतील. अखेरीस हामिल्टनच्या म्हणण्याप्रमाणेंच राज्यपद्धति ठरविण्यांत आली. अमेरिकन युद्धाच्या अगोदर अमेरिकेंत स्वतंत्र वेगवेगळीं संस्थानें होतीं त्यांचेच पुढें संयुक्त राज्य बनविण्यांत आलें. पण आपणांस ही संयुक्त राज्यपद्धति अनुकरणीय होणार नाहीं. कारण आपला देश अविभक्त होता व आहे. आपण सर्व एकछत्राखालीं होतों. पाश्चात्य देशांत आज दोन तीनशें वर्षे प्रजासत्ताक राज्यपद्धति चालू आहे. पण स्त्रीपुरुषांना मतदानाचा हक्क मिळण्यापलीकडे लोकसत्तेचें बीं रुजलें नाहीं. समतेच्या तत्त्वावर फ्रेंच राज्यक्रांति झाली पण त्याचा परिणाम बेशिस्त लोकांच्या हातांत सत्ता जाऊन अंदाधुंदी माजली. डँटनसारख्या क्रांतिकारकाला सुद्धां केवळ त्याचें मत थोडेसें निराळें पडल्याबरोबर लोकांनीं ठार करण्यास कमी केलें नाहीं. पण लवकरच प्रतिक्रिया सुरू झाली आणि नेपोलिअनला त्याच लोकांनीं आपला पादशहा बनविलें. समतेच्या तत्त्वामुळें खऱ्या लोकसत्तेला अडथळा आला. त्याचप्रमाणें वारा कसा वाहतो आहे हें ओळखून कित्येक शहाण्या मुत्सद्यांनीं आपली लगाम थोडी ढिली सोडली त्यामुळेंहि लोकसत्तेची प्रगति जागच्याजागींच थबकली. इंग्लंड आतां मजुरांना मंत्रिमंडळांत घेऊं लागलें म्हणून जुनी राज्यपद्धति तशीच राहिली. बिसमार्कनेंहि प्रसंग ओळखून लोकांस सवलती दिल्या. पण कितीहि अडथळे आले तरी लोकसत्तेचें पाऊल पुढेंच पडत आहे. मत देण्याचा हक्क म्हणजेच लोकसत्ता असेंच पाश्चात्य देशांतील लोक आजपर्यंत समजत असत. नवीन कायदा करण्याचा व असलेल्या कायद्यांत फेरफार करण्याचा हक्कहि लोकांना पाहिजे. असा हक्क स्वित्सर्लंडच्या लोकांनीं मिळविला. अमेरिकेंत कांहीं संस्थानांत अधिकाऱ्यांना काढून टाकण्याचा हक्कहि लोकांना देण्यांत आला आहे. युरोप व अमेरिका यांनी प्रातिनिधिक राज्यपद्धति अमलांत आणली तेव्हां त्यांना वाटलें कीं आतां लोकसत्ता पूर्णपणें स्थापित झाली. स. १९११ सालीं आपणहि त्यांचें अनुकरण केलें. पण आपला अनुभव काय आहे बरें? आपले प्रतिनिधि पैसेखाऊ निघाले. आणि सर्व राष्ट्रें आपली छीथू करूं लागलीं. प्रातिनिधिकसत्ता म्हणजे लोकसत्ता नव्हे. रशियानें प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अंगिकार केला नाहीं. आतां खरी लोकसत्ता कशी प्रस्थापित करतां येईल हें मी आणखी दोन व्याख्यानांत तुम्हांस सांगेन.

## व्याख्यान पांचवें.

स. १९०१ सालीं चिनी लोकांनीं बंड केलें व पराभव करून घेतला, त्यांत पाश्चात्त्यांची भौतिक सुधारणा श्रेष्ठ आहे हें त्यांस कळून चुकलें. पण त्याचा एक वाईट परिणाम असा झाला की, पाश्चात्त्यांची प्रत्येक गोष्ट त्यांस पुढें चांगली वाटूं लागली. तथापि हें विसरतां कामा नये कीं, भौतिक सुधारणा त्यांनीं केली तशी व तितकी राज्यशासन शास्त्रांत त्यांना प्रगति करतां आली नाहीं. युद्धकलेंत तर त्यांनीं जबरदस्त क्रांति केली. परंतु लोकसत्तेचें तत्व अमलांत आणतांना ते अडखळत आहेत. लोकसत्ताक राज्यपद्धति अद्यापि तेथें यशस्वी झाली नाहीं. जर्मनी आणि जपान या राष्ट्रांनीं जोरानें पुढें पाऊल टाकलें तसें लोकसत्ता असणाऱ्या राष्ट्रांना करितां आलें नाहीं. लोकसत्ताक राष्ट्रांचा कारभार दुर्बल होऊं लागला. प्रत्यक्ष राज्यकारभार करणारे लोक डोईजड होतील या भीतीनें त्यांना पूर्ण अधिकार लोक देण्यास कचरतात. अधिकाराच्या अभावीं राज्यकारभार समाधानकारक व धडाडीचा होत नाहीं. सत्ता

व योग्यता हीं एकच मानतां कामा नये. यांतील फरक पाश्चात्त्यांच्या अद्यापि लक्ष्यांत आला नाहीं. मनुष्यांचे तीन प्रकार असतात. दूरचें अगोदर ज्यांना दिसतें ते; असे फारच थोडे लोक असतात. हे मार्गदर्शक होत. दुसऱ्या वर्गांतील लोकांना त्याच गोष्टी समजण्यास वेळ लागतो. यांना नवीन कांहीं काढतां येत नाहीं. ते पहिल्या वर्गांतील लोकांचें अनुकरण करतात. त्यांचे अनुयायी बनतात. तिसऱ्या वर्गांतील लोकांना कोणी किती शिकवण्याचा प्रयत्न केला तरी उमज पडतच नाहीं. ते फक्त सांगावें तसें करतात. कृतीवरच सर्व प्रगति अवलंबून असल्यामुळें जगाच्या प्रगतीची जबाबदारी या लोकांवरच येऊन पडते. सर्व लोक शहाणे होणें शक्य नाहीं व ते शहाणे होईपर्यंत लोकसत्ताक राज्यपद्धति लोंबत ठेवतां येत नाहीं. म्हणून सत्ता आणि योग्यता यांतील भेद लक्ष्यांत घेऊन प्रजासत्ताक राज्यपद्धति अमलांत आणली पाहिजे. राज्यकारभार करणाऱ्या मंडळीकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला पाहिजे. एकाद्या कंपनीचे भागीदार असतात तसे राष्ट्रांतील लोक होत. कंपनीचा कारभार जसा तज्ज्ञ मंडळीकडून केला जातो तद्वत् राज्यकारभाराकरतां तज्ज्ञ लोकच निवडले पाहिजेत; म्हणजेच प्रजासत्ताक राज्यपद्धति यशस्वी होईल.

## व्याख्यान सहावें.

राज्यकारभार हें एक एंजिन आहे. तें बलाढ्य पाहिजे. पुष्कळ मोठें काम करण्याचें सामर्थ्य एंजिनांत पाहिजे. पण एवढ्या मोठ्या एंजिनालाहि मागें पुढें करून पूर्णपणें आपल्या स्वाधीन ठेवण्याची शक्ति एंजिनिअरामध्यें पाहिजे. लोक हे एंजिनिअर होत. प्रतिनिधीला एकदां निवडून दिलें म्हणजे पुढें तो बरोबर काम करीत नाहींसा झाला तर मतदारांना पुनः निवडणूक होईपर्यंत स्वस्थ बसावें लागतें यामुळें पाश्चात्यांची राज्यपद्धति सुरळीत चालत नाहीं. एंजिन आपण पुढें नेतों तसें मागें आणतां आलें पाहिजे. एवढ्याकरतां मतदानाच्या हक्कावरोबर अधिकारावरून काढून टाकण्याचा हक्क लोकांना मिळाला पाहिजे. या हक्कांबरोबर कायदे करण्याचा व अनिष्ट कायदे रद्द अथवा दुरुस्त करण्याचा हक्क लोकांना मिळाला म्हणजे लोकसत्ता परिपूर्ण झाली. आजपर्यंत कोणतीहि नवी गोष्ट करावयाची म्हणजे राजे करीत. हा अधिकार आतां प्रत्यक्ष लोकांकडे पाहिजे. कारण राजाच्या गादीवर आतां लोक अधिष्ठित झाले आहेत. अमुक प्रकारचा कायदा असावा असें लोकांनीं आपल्या राष्ट्रीय सभेंत ठरविलें म्हणजे सरकारनें अथवा अधिकाऱ्यांनीं त्याप्रमाणें केलें पाहिजे. प्रजासत्ताक राज्यपद्धतींत लोकांनीं दोन भाग केले पाहिजेत. मालकीचीं अथवा यजमानपणाचीं कामें आपणांकडे ठेवून बुद्धीचीं कामें नोकरांकडे ठेवलीं पाहिजेत. राज्यकारभार करणाऱ्यांकडे कायदे करणें, न्याय करणें, अंमलबजावणी करणें, अधिकारावर नेमणुकी करण्याकरतां परीक्षा घेणें, आणि इतिवृत्त लिहून काढणें हीं कामें सोपवलीं पाहिजेत. कारभारी मंडळ लोकांच्या जीवनक्रमाला सुव्यवस्थिपणा देतें म्हणून या मंडळांतील लोक वाकबगार असून त्यांस भरपूर अधिकार असला पाहिजे. या मंडळानें लोकांच्या कल्याणाचा मार्ग हुडकून काढला पाहिजे. असें तें न करील तर लोकांना तें मंडळ अधिकारभ्रष्ट करतां येईल. इतकें झालें म्हणणे प्रजासत्ताक राज्यपद्धति यशस्वी झाल्यावांचून राहणार नाहीं.

# लोकधारणा—व्याख्यानें चार.

लोकधारणा हा शब्द फार व्यापक आहे. लोकांची उपजीविका, समाजाचें अस्तित्व, राष्ट्राचें कल्याण, आणि जनतेचा जीवनक्रम इतक्यांचा त्यांत समावेश होतो. लोकधारणेचा प्रश्न अलीकडचा आहे. यांत्रिक शोधांमुळें मनुष्यांचे हातधंदे बसले. लोकांची उपासमार होऊं लागली. हातानें माल उत्पन्न होई त्याच्यापेक्षां हजारों पटीनें यंत्रावर माल होऊं लागला. त्यामुळें लोकांची संपत्ति यंत्रवाल्यांकडे गेली. तेव्हां ही स्थिति सुधारण्याचे प्रयत्न सुरू झाले. समाजसत्तादि वाद अस्तित्वांत आले.

पाश्चात्य देशांत ही यंत्रोद्भव आपत्ति टाळण्याचा योग्य उपाय अद्यापि सांपडलेला नाहीं. प्रजासत्ताक राज्यपद्धतीच्या वादांत रुसोला जें स्थान आहे तेंच स्थान समाजसत्तावादांत मार्क्सला दिलें जातें. पंचवीस तीस वर्षांच्या सतत वाचनानें मार्क्सनें असें ठरविलें कीं भौतिक परिस्थिति अमल त्याप्रमाणें मानवी इतिहासाला वळण लागतें. मानवी संस्कृतीचा इतिहास म्हणजे भौतिक परिस्थितीशीं अनुरूपता होय. मार्क्सच्या मताला पुढें पुष्कळ फांटे फुटले. तथापि मार्क्सचा सिद्धांत सदोष आहे असें आतां लोकांना आढळून येत आहे. मालक व गुलाम, जमीनदार व कूळ, कारखानदार व मजूर यांच्यांत लढे लागूनच समाजाची प्रगति होत असते, म्हणजे समाजाच्या प्रगतीला असले लढे अवश्य आहेत हें म्हणणें खरें नाहीं. आपलें आस्तित्व टिकावें, आपण जिवंत रहावें याकरतां जी धडपड चाललेली असते तिच्यामुळें सामाजिक प्रगति होत असते व मानवी इतिहास याच्याच भोंवतीं घिरट्या घालीत असतो. वर्गावर्गातील भांडणें हें कार्य आहे, कारण नव्हे. जरुरीपुरता माल उत्पन्न होत असतो तोंपर्यंत समाज स्थिर असतो. पण जरुरीपेक्षां फाजील मालाची निपज होऊं लागली म्हणजे समाजाचें स्थैर्य ढळतें. सर्व आर्थिक उलाढाली लोकधारणेंत केंद्रीभूत झालेल्या असतात.

लोकधारणेच्या बाबतींत एका राष्ट्रानें जे उपाय योजिले असतील तेच दुसऱ्या राष्ट्राच्या कामीं पडतील असें नाहीं. निरनिराळ्या देशांत निरनिराळी परिस्थिति असते. आपल्या देशांत आपण सर्वत्र दरिद्री आहों, अतिशय धनाढ्य वर्ग व अत्यंत कंगाल वर्ग इतर कांहीं राष्ट्रांत आहेत तसे आपल्यांत नाहींत. कारण यांत्रिक साधनांचा उपयोग आपण अद्यापि करूं लागलों नाहीं. सध्यां यंत्रवाला पैसा मिळवतो. अगदीं प्रथम संपत्तीचा सामुदायिक उपभोग असे. लोक सर्वजण मिळून धान्याची निपज करीत व धान्य वांटून घेत. नंतर जमीनदारी पद्धति प्रचारांत आली. म्हणजे थोड्या लोकांच्या मालकीची पुष्कळ जमीन झाली आणि बाकीचे लोक त्यांचीं कुळें म्हणून शेतांत खपूं लागले. समायिक उपभोग अथवा जनसत्ता पैशाचा उपयोग सुरू झाला तेव्हां नष्ट झाली. पैशाच्यामुळें व्यापारी वर्ग अस्तित्वांत आला व जमीनदाराच्या हातांतून व्यापाऱ्याच्या हातांत संपत्ति गेली. आतां यंत्रसाधनांचा उपयोग करणाराकडे संपत्तीचा लोट वळत आहे. मालाचा खप करण्याच्या कामीं व्यापारी वर्ग उपयुक्त होतो. याशिवाय त्या वर्गाची उपयुक्तता नाहीं, म्हणून कांहीं कारखानदार आपल्या मालाचा आपणच खप करतात. आपणांकडे जमिनीच्या किमती सध्यां वाढत आहेत. उत्तरोत्तर त्या वाढणार. जमिनीच्या मालकाच्या मेहनतीवांचून वाढलेल्या किमतीचा फायदा मालकास न मिळतां राष्ट्राला मिळाला पाहिजे. या करितां सर्व जमिनींची किंमत करून तिच्यावर कर बसवावा व बारीकसारीक कर काढून टाकावे. असें करण्यांत सरकारचें उत्पन्न वाढेल. मालक सांगेल ती त्या जमिनीची किंमत समजावी. कमी किंमत मालक सांगेल ही भीति नको. कारण त्याच किमतीनें तीच जमीन वाटेल तेव्हां सरकारनें विकत घ्यावी म्हणजे झालें. अशा रीतीनें किमती ठरल्या म्हणजे नंतर किमतींत वाढ होईल ती सरकारची असें कायदा करून ठरवावें.

जमिनीप्रमाणें इतर उत्पन्नावर कर बसविणें हा एक धनविभागणीचा प्रकार आहे. चिनी लोकांत लक्षाधिपति फार नसल्यामुळें मिळकतीवरील कराचें उत्पन्न फार होणार नाहीं. म्हणून उद्योगधंदे वाढविले पाहिजेत व ते सरकारी झाले पाहिजेत. अशा रीतीनें द्रव्योत्पादन होतें, सर्व लोकांस काम मिळतें आणि थोड्या लोकांच्या हातांत संपत्ति रहात नाहीं. आगगाड्या, तारायंत्रें वगैरे कारखाने अमेरिकेंत व युरोपांतील कित्येक देशांत महायुद्धांत सरकारनें आपल्या हातांत घेतले.

यानंतर अन्नाचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. याचा अनुभव महायुद्धांत आला. अन्नाच्या तुटवड्यामुळें जर्मनीचा पराभव झाला. सर्व लोकांना भरपूर अन्न मिळालें पाहिजे आणि तें पुनः स्वस्त मिळालें पाहिज. चीन देशांत भरपूर अन्न होत असून लोकांची उपासमार होत आहे. याचें कारण आपण

देशाच्या बाहेर म्हणजे परदेशांत सालोसाल खाण्याचे पदार्थ पाठवितों. तीन वर्षेपर्यंत लोकांना अन्नाचा तुटवडा पडणार नाहीं इतकें अन्न आपण सांठवून ठेवलें पाहिजे. सर्वच देशांत अन्न पुरेसें उत्पन्न होतें असें नाहीं. ब्रिटिश बेटांत तीन महिने पुरेल इतकेंच अन्न पिकतें. जपानांत होणाऱ्या खाद्यपदार्थांनीं तेथील लोकांचा अकरा महिन्यांचा पुरवठा होतो. जर्मनीला दोन महिन्यांचा तुटवडा येतो. सर्व देशाला खावयाला अन्न नसलें म्हणजे ती केवढी मोठी आपत्ति आहे याचा विचार करा. फ्रान्स मात्र पुरेसें अन्न पिकवतो. पुरेसें अन्न मिळत नसल्यामुळें चीनची लोकसंख्या कमी होत चालली आहे. ऐशीं कोटी लोकांना पुरेल इतकें अन्न आपल्या देशांत उत्पन्न करतां येईल. कृषिप्रधान देश असतांहि आपली उपासमार होत आहे. शेतकीची सुधारणा एवढ्याकरतां झाली पाहिजे. अमेरिकेंतसुद्धां शेतीचें ध्येय चुकीचें आहे. शेती हा नफ्याकरतां व्यापारी दृष्टीनें धंदा म्हणून केला जातो, हें बरोबर नाहीं. सर्व लोकांना भरपूर अन्न मिळावें हाच शेती करण्याचा उद्देश असला पाहिजे. जमीन कसणाराच जमिनीचा मालक असणें जरूर आहे. सध्यां शेतकरी पिकवतो तें शेंकडा साठ या प्रमाणांत जमिनीचा मालक घेऊन जातो. पिकेल तें सर्व कसणारास मिळालें म्हणजे तो अधिक पिकवण्याचा प्रयत्न करतो. यांत्रिक साधनें, खतें, आलटून पालटून पिकें करणें वगैरेंनीं पीक वाढवतां येईल. पूर, अनावृष्टि, टोळधाड यांच्यापासून पिकांचा बचाव केला पाहिजे. जंगलें राखलीं म्हणजे पूर व अनावृष्टि या दोघांचा प्रतिकार होतो. तसेंच पिकलेलें अन्न देशांतील सर्व लोकांस मिळावें म्हणून वाहतुकीची सोय केली पाहिजे. सर्वत्र आगगाड्यांचे रस्ते व मोटारीचे रस्ते झाले पाहिजेत. नद्यांच्या पाण्याचा उपयोग करून घेतला पाहिजे. नद्या खोल केल्या पाहिजेत. आपली उपासमार होत असतांना आपण परदेशीं खाद्य पदार्थ पाठवितों याचें कारण युरोपनें आपणांस आर्थिक पेचांत पाडलें आहे. ही हिंदुस्थानासारखी स्थिति आहे. त्या देशांत पुरेसें पिकत नाहीं इतकेंच नव्हे तर सालोसाल दुष्काळ पडतात. तथापि खाद्यपदार्थांची निर्गत करणाऱ्या देशांत हिंदुस्थानाचा दरसाल तिसरा नंबर लागतो. प्रत्येकाला अन्नाचा भरपूर पुरवठा झाला म्हणजे लोकधारणेचे दुसरे प्रश्न आपोआप सुटतील.

अन्नानंतर महत्त्वाचा प्रश्न वस्त्राचा. या सुधारणेच्या काळांत तर कपड्यांना फारच महत्त्व आलें आहे. आवश्यकता, सुख व चैन अशी तीन प्रकारची रहाणी असते. सुखाच्या व चैनीच्या राहणीचा विचार सोडून पहिल्या प्रकारच्या राहणीचा विचार केला तरी आपणां चाळीस कोटी लोकांना जरूरीपुरतांहि कपडालत्त मिळत नाहीं. आवश्यक वस्त्राभावीं मृत्युसंख्या वाढून लोकसंख्या कमी होते. ताग, कापूस, रेशीम आपण पूर्वी उत्पन्न करून त्यांचे उत्तम कपडे करीत असूं. पण आज आपणांस परदेशचे लोक कापडताहेत. या पायीं आपलें अतोनात नुकसान होत आहे. माणसागणीं एक डालरचें परदेशी कापड आपण वापरतों. परराष्ट्रें चीनला कापड पाठवतात तें खंडणी म्हणून नव्हे तर नफा मिळवावा म्हणून. परदेशी मालावर बहिष्कार व स्वदेशी मालाचा वापर केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असें आपण केलें तरीसुद्धां आपणांस यश येईलच असें नाहीं. कारण जकात बसविण्याचा अधिकार परकीयांचा आहे. मंचूराजांनीं मूर्खपणाचे तह करून ही सत्ता घालविली आहे. आयात मालावर पांच टक्के जकात बसविली तर देशांत होणाऱ्या मालावरहि तितकीच जकात बसविली पाहिजे, एवढेंच नव्हे तर देशांतल्या देशांत इकडून तिकडे कापड जाऊं लागलें कीं प्रत्येक वेळीं आणखी जकात. यामुळें देशी कापड महाग पडतें व परदेशी स्वस्त पडतें. म्हणून परदेशी मालावरील जकात वाढविल्या शिवाय गत्यंतर नाहीं. सरकारनेंच कापडाच्या गिरण्या काढून लोकांना स्वस्त कापड विकलें पाहिजे.

---

# सारसंग्रह.

बंगाली मासिकांपैकीं 'भारतवर्षांतले दोन तीन लेख वाचनीय आहेत. पहिला 'पातंजलदर्शन व गीता' या विषयावरील. या लेखांत त्या दोहोंमधील संबंध विशद करून दाखविला आहे. गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं 'ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे' असें म्हणण्यांत आलें आहे. यावरून लोकांचे दोन प्रकारचे गैरसमज झालेले पाहण्यांत येतात. एक गैरसमज हा कीं, गीतेचा विषय ब्रह्मविद्या अर्थात् अध्यात्मज्ञान हा आहे, प्रत्यक्ष व्यावहारिक जीवनाशीं गीतेचा संबंध नाहीं; आणि दुसरा गैरसमज म्हणजे गीतेंतलें योगशास्त्र आणि पतंजलीचें योगशास्त्र (राजयोग) हीं एकच. गीतेचें इंग्रजींत भाषांतर करणारे टॉमसन साहेबांनीं अशीच समजूत करुन घेतलेली आढळते. सांख्यमत केवळ 'ज्ञानान्मुक्तिः' म्हणणारें आहे; त्यांत कर्म व भक्ति या दोहोंनाहि स्थान नाहीं. पतंजलीनें ईश्वराची भक्ति मान्य केली आहे. पातंजल योगशास्त्रांत कर्माला फार गौणपद देण्यांत आलें आहे. योगाभ्यास (चित्तवृत्तिनिरोध) करण्यास असमर्थ असलेल्यासाठीं कर्म आणि तेंहि तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या तीन रूपांचेंच कर्म हें उपयोगी मानिलें गेलें आहे, पण योगाभ्यास साध्य झालेल्यांना कर्म हें बाधक समजलें गेलें आहे. गीतेच्या मतानें उपकारक कर्म म्हणजे केवळ तप, स्वाध्याय व यज्ञयागादिकांच्या द्वारें ईश्वरोपासना हेंच नसून ईश्वरार्पित सर्व कर्मांचा अंतर्भाव त्यांत होतो. पातंजल योगशास्त्र सांगतें कीं जसे यम, नियम, आसन हे चित्तवृत्तिनिरोधाचे उपाय आहेत, तसाच ईश्वरोपासना हाहि एक उपाय आहे. यापलीकडे त्या शास्त्रांत भक्तीला महत्त्व दिलेलें नाहीं. पण गीतेंत ईश्वरभक्तीवांचून मोक्षोपायच नाहीं. श्रद्धावंत ईश्वरभक्त हाच सर्वश्रेष्ठ योगी असें गीतेचें मत आहे. सारांश, गीतोक्त योग म्हणजे पातंजलयोगशास्त्रांतला राजयोग नव्हे. ज्ञानयुक्त कर्म हें बंधनाला कारण होत नाहीं हें पातंजल शास्त्रालाहि मान्य आहे ('क्लेशमूलः कर्माशयः दृष्टादृष्टजन्मवेदनीयः) म्हणजे अज्ञान, अहंकार व आसक्ति यांनीं युक्त जें कर्म तें इहजन्मीं व परजन्मीं क्लेश देणारें होतें. ज्ञानी पुरुषांनीं कर्म केल्यापासून अर्थात् हानि नाहीं; पण गीतेप्रमाणें कर्म करण्याविषयीं आग्रहाचा उपदेश पातंजलशास्त्र करीत नाहीं. या व इतर कित्येक बाबतींत पातंजल योगशास्त्र व गीता यांच्यांत भेद आहे. तथापि प्रत्येक मत व पंथ यांच्यांतला सारभूत सत्यांश ग्रहण करण्यास गीता मागें घेत नाहीं. म्हणून चित्ताला स्थिरता देण्याचा उपाय म्हणून गीतेच्या पांचव्या व सहाव्या अध्यायांत ('स्पर्शानकृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः इ. श्लोकांत) पातंजलवर्णित राजयोगाचा प्रामुख्येंकरून उल्लेख केला आहे. उल्लेखित वर्णिलेली पद्धति कर्मयोगाची नाहीं आणि ज्ञानयोगाचीहि नाहीं; अगदीं उघड उघड पातंजल योगशास्त्रवर्णित राजयोगाची आहे. सारांश, मनाला एकाग्र व ईश्वराभिमुख करण्यापुरता गीतेनें पातंजल राजयोगाचा उपाय सर्वश्रेष्ठ व बलवान म्हणून सांगितला

आहे इतकेंच. पण सर्व कर्म ईश्वरार्पण करण्याचें अर्थात् भक्तियोगाचें तत्त्व गीतेनें सोडलेलें नाहीं, आणि या तत्त्वाचें प्रतिपादन हीच गीतेचीं मुख्य शिकवणूक आहे. ' योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना । श्रद्धावान् भजते योमां स मे युक्ततमो मतः । '

दुसरा लेख उपनिषत्कालीन राजनीति व धर्मनीति यांसंबंधाचा आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, गौतमबुद्धाच्या काळापासूनचा आचार, व्यवहार व राजनीति यांचा इतिहास मिळतो; पण त्या पूर्वीच्या म्हणजे उपनिषदांच्या रचनेच्या काळाचा इतिहास केवळ अनुमानानें काढावा लागतो. राजनीतीच्या क्षेत्रांत राजधर्माचा पूर्ण विकास भारत वर्षांतच झालेला दृष्टीस पडतो. राजा जनक व रामचंद्र हे या पूर्ण विकासाचे—खरोखरी म्हणा अगर काल्पनिक म्हणा—आदर्श होत आणि त्यांच्या चारित्र्यनीतीचा प्रभाव अद्याप भारत वर्षांत अक्षुण्ण दिसतो. राजा म्हणजे प्रत्यक्ष विष्णूचा अवतार, प्रजेचा पिता ही समजूत राजा व प्रजा या दोघांनाहि सुख देणारी झाल्याचीं बरींचशीं उदाहरणें गतकालीं घडलेलीं असलीं तरी अत्याचारी राजाला राजपद सोडण्याला प्रजेनें भाग पाडल्याचींहि उदाहरणें क्वचित् घडलीं. उलट राजद्रोह पितृद्रोहासारखें पापकृत्य मानण्यांत येत असे. राजाविषयीं प्रजेला प्रथम आदरातिशय वाटे; कालांतरानें त्याचें भयांत रूपांतर झालें; आणि आदर व राजदंडाचें भय हीं दोन्ही पुढें हिंदुस्थानावर आक्रमण केलेल्या परकीय राजकर्त्यांना आपली सत्ता दृढमूल करण्यास उपयोगी पडलीं. भक्ति आणि भय यांची जात एकच आहे. भय हें भक्तीचें बाह्यचिन्ह पुष्कळ वेळां असतें. रामचंद्र व जनक यांचेविषयीं प्रजेच्या ठायीं शुद्ध भक्तिभाव होता.

भारतवर्षीय इतिहासाचें प्रथम युग म्हणजे वेद व उपनिषदें यांचा काळ. या काळचा इतिहास अलिखित आहे. दुसरें युग उपनिषत्कालापासून बौद्ध कालापर्यंतचें. या काळांतल्या ग्रंथांतून प्रक्षिप्त भाग बराच आढळतो. तिसरें युग म्हणजे अस्सल भारत—रामायणाच्या रचनेचा काळ. जनक—रामचंद्राच्या उज्वल चरित्रांतला राजधर्म किंचित् विकृत स्वरूपांत भारतादि ग्रंथांत आढळतो. भारतांत कित्येक ठिकाणीं कुटिलता व नीचवृत्ति दिसते ती या विकृतीमुळें. उदाहरणार्थ—भरद्वाज नांवाच्या मुनीच्या शब्दांनीं भीष्मानें केलेला उपदेश. कित्येक स्थळीं नीतिबाह्य असा उपदेश भीष्माच्या तोंडीं घालण्यांत आला आहे. हिंसा हाच माणसाचा स्वाभाविक धर्म आणि स्वार्थरक्षण हेंच माणसाचें प्रधान कर्तव्य आहे, असें तेथें म्हटलें आहे. बलानें किंवा छलानें ( कपटानें ) राजानें प्रजेचें धनग्रहण करावें हें त्याचें कर्तव्य आहे, अशा प्रकारचा राजधर्म उपदेशिणाऱ्या नीतिशास्त्रकारांत कौटिल्य हा प्रमुख होता. भारतासारख्या जुन्या ग्रंथांत आपलीं मतें घुसडून देणाऱ्या लेखकांपेक्षां कौटिल्यासारखे स्वतःचीं मतें स्वतःच्या नांवानें प्रतिपादणारे लेखक फार चांगले व धीट म्हटले पाहिजेत. कौटिल्याच्या ग्रंथाला ' अर्थशास्त्रा ' पेक्षां कल्पित कथा हेंच नांव अधिक शोभतें. त्यानें समाजाची कांहीं विशिष्ट स्थिति कल्पून तिच्यांतल्या दोषाच्या प्रतिकारार्थ कांहीं विशेष विधि व निषेध वर्णिले आहेत. या ग्रंथांत कूटनीति भरली आहे ही गोष्ट खुद्द कौटिल्यानेंच कबूल केली आहे. राजाच्या उपभोगासाठीं राज्य ही राजधर्माविषयीं कौटिल्याची कल्पना होती. अग्नि वृक्षास जाळून टाकतो

पण माळी झाडाला पाणी घालून झाडाचीं फुलें ग्रहण करतो. त्याप्रमाणें राजानें प्रजेला एकदम नष्ट न करतां खुष ठेवूनच तिचें द्रव्य हरण करावें असा कौटिल्याचा उपदेश आहे. राजानें स्वार्थबुद्धीनें राज्य करावें. पुत्ररूप शत्रु जर जन्माला आला तर त्याची जी व्यवस्था करण्यास त्यानें सांगितलें आहे ती पाहिली असतां त्याचें नीतिशास्त्र निव्वळ कल्पित कादंबरी आहे असें कोणीहि म्हणेल. राजानें पुत्रपालन कसें करावें याविषयींचा खरा हितप्रद बोध त्या ग्रंथापासून मुळींच मिळत नाहीं.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत सांगितलेली राजनीति केव्हांहि प्रचारांत नव्हती. त्या ग्रंथांत स्वमतस्थापनार्थ उद्धृत केलेलीं चार पांच व्यक्तींचीं मतें काल्पनिक व व्यक्तिहि काल्पनिकच आहेत. भरद्वाज, विशालाक्ष व पराशर या सगळ्या काल्पनिक व्यक्ति होत. उपनिषत्काळीं धर्मनीति व राजनीति यांच्यामध्यें कौटिलीय अर्थशास्त्रावरून दिसतो तसा विरोध मुळींच नव्हता. उलट, धर्मनीति हाच राजनीतीचा पाया होता.

'प्रवर्तक' नामक मासिकांत सरस्वती देवीसंबंधाचा गमतीचा इतिहास देण्यांत आला आहे. पंजाबांत सरस्वती नदीच्या तीरावर आर्यांनीं प्रथम वस्ती केली, म्हणून ऋग्वेदांत इतर नद्यांपेक्षां सरस्वतीचेंच महात्म्य विशेष वर्णिलेलें आढळतें. पुरुनामक राजवंश हा आर्यांमधला बराच प्राचीन राजवंश होता. या वंशांतल्या पूर्वपुरुषांनींहि प्रथम सरस्वतीच्या दोन्ही तीरांवर ठाणें देऊन नंतर हळू हळू आपला अंमल वाढविला. म्हणून सरस्वती नदीची अधिष्ठात्री देवता ( सरस्वती ) हीच त्यांनीं आपली कुलदेवता केली. मात्र तिला आपल्या भरतकुलावरून 'भारती' असें नवें नामाभिधान दिलें. अशा रीतीनें ब्राह्मण ऋषि व क्षत्रिय पुरु या दोघांनाहि सरस्वती पूज्य होऊन राहिली. सरस्वती देवीचें पूषा, इंद्र, मरुद्गण प्रभृति इतर देवतांशींहि सख्य होतें. एकदां देवांनीं एक यज्ञ आरंभिला होता. त्याप्रसंगीं अश्विनीकुमारांनीं आपल्या वैद्यकीज्ञानानें आणि सरस्वती देवीनें उत्तम भाषणानें इंद्रादि देवांना उत्कृष्ट साह्य केलें होतें. त्यावरून सरस्वती ही 'वाग्देवी' म्हटली जाऊं लागली अशी आख्यायिका यजुर्वेदांत आहे. सारांश वाग्देवी, भारती व सरस्वती हीं तिन्ही एकच होत.

सरस्वती देवीच्या मूर्तिरचनेचे भिन्न भिन्न प्रकार आढळतात. कोठें ती एकटीच उभी किंवा बसलेली, कोठें ती ब्रह्मदेवासंनिध असलेली, कोठें विष्णुसंनिध असलेली, कोठें कमलपुष्पावर उभी किंवा बसलेली, कोठें ती त्या पुष्पांतून बाहेर आलेली, कोठें तिचें वाहन हंस, कोठें मयूर, कोठें चतुर्भुजा, कोठें द्विभुजा, कोठें, पाशांकुशधारी, कोठें वीणा, अक्षमाला, व पुस्तक हातांत धारण केलेली, कोठें त्रिनेत्र, कोठें 'रत्नकुंडलमंडिता' तर कोठें 'मुक्ताकुंडलमंडिता' अशी तिच्या भिन्न भिन्न प्रकारच्या मूर्ति म्हैसूर, गांधार, गौडदेश, महाराष्ट्र इ. प्रांतांतून आढळतात.

---

कलिंगसम्राट् महाराजा खारवेल यांचा उदयगिरीवरील

# हस्तिगुंफेंतील शिलालेख.

(ले०- वि. म. कोल्हटकर.)



(ही सर्व माहिती 'नागरी प्रचारिणी पत्रिके'च्या आठवे भागाच्या तिसरे अंकांतील पंडित काशीप्रसाद जयस्वाल यांच्या लेखावरून लिहिलेली आहे).

या लेखाचें मुख्य महत्त्व असें आहे कीं, व्हिन्सेंट स्मिथ यांनीं "या शिलालेखाच्या उद्घाटणामुळें मला माझ्या इतिहासाची नवीन आवृत्ति छापावी लागत आहे" असें जाहीर केलें आहे. जैनधर्माच्या इतिहासांतील हा शिलालेख फार जुना आहे. या लेखाच्यावेळीं जिनाच्या मूर्तीची पूजा केली जात होती. "कलिंगजिना" ची मूर्ती येथून पाटलीपुत्रास पळवून नेलेली होती, ती सम्राट् राजा खारवेल यानें पाटणावर स्वारी करून जिंकून तेथील संपत्तीसह परत आणिली, असें या शिलालेखांत म्हटलेलें आहे. मगध देशाच्या नंद नामक राजांपैकीं एकानें कालवा खणिला होता. तोच राजा खारवेलनें आपले राजधानीपर्यंत आणून सोडिला. हा नंद म्हणजे शककर्त्या नंदांच्या १०३ शकामध्यें असलेला नंद होय. खारवेल जैनधर्मी होता. शिलालेखांत "धर्मविजयचक्र खंडगिरीवर फिरलें होतें." असा उल्लेख आहे तेव्हां महावीर अगर त्याचे पूर्वींचा कोणी जैन तीर्थंकर यानें उदयगिरीवर वास केला असला पाहिजे. या लेखावरून पतंजलि भाष्यकाराच्या उदाहरणांतील यवन राजा डेमेट्रियसच मथुरा साकेत वगैरे जिंकून पाटलीपुत्रावर स्वारी करण्याच्या विचारांत होता तो खारवेलच्या पराक्रमामळें भिऊन पळून गेलेला होय असें दिसतें. खारवेलनें "अंगसप्तिका"चा चौथा भाग पुन्हा तयार केला असा उल्लेख शिलालेखांत आहे.

खारवेल चेदी वंशांतील राजा होय. चेदी वंशाचा वेदामध्यें उल्लेख आहे. तो प्रथम विदर्भ देशांत राज्य करीत होता. तेथून छत्तिसगडावरून तो कलिंग देशांत गेला. खारवेलच्या वेळीं सातकर्णी राजा पश्चिमेस होता. खारवेलच्या स्त्रीनें यास "कलिंगचक्रवर्ती" व त्याच्या जिनमूर्तीला "कलिंगजिन" म्हटल्याचा उल्लेख केलेला आढळतो. आश्चर्याची गोष्ट ही कीं चेदिराज खारवेल याचा जैनधर्मग्रंथांत कोठेंहि उल्लेख नाहीं. खारवेलच्या काळामध्यें मनुष्यांची खानेसुमारी होत असे. गांवांतून व शहरांतून एक रजिष्टर ठेवीत असत त्याला "चरित्र" अथवा "पुस्त" असें म्हणत असत. खारवेलच्यावेळीं कलिंग देशाची खानेसुमारी ३५ लाख होती असा उल्लेख आहे. लेख १५ फूट लांब व ५ फूट रुंद आहे. तो पुष्कळ कारागिरांनीं मिळून खोदला असावा असें अक्षरांच्या भिन्नतेवरूनच स्पष्ट होत आहे. लेखभाषा पाली भाषेशीं पुष्कळशी जुळते. शब्दरचनेवरून काव्यकुशलताहि दिसून येते. शिवाय सूत्रकारांच्या पद्धतीप्रमाणें थोड्या शब्दांत पुष्कळ गर्भितार्थ दाखविण्याची शैली साधलेली आहे. खारवेलानें महाराज्याभिषेकोत्सव केला. जैनधर्मी असल्यामुळें राजसूययज्ञच केला. लेखामध्यें चेदि वंशाला "राजर्षिकुल" म्हटलेलें आहे. ब्राम्हणांना अग्निहोत्रांनीं सुसज्जित अशीं गृहें व सोन्याचे कल्पवृक्ष दान केल्याचा उल्लेख आहे. राजा खारवेल याची तुलना वेन राजाशीं केलेली आहे. महावीराचें गृहस्थाश्रमांतील नांव वर्धमान आहे. खारवेलप्रशस्तीमध्यें "वर्धमानसेसवो वेनाभिविजयो" असें म्हटलें आहे.

---

श्री.

राजवाडेस्मारक योजना

# विनंति

मार्गशीर्ष शु॥ १२ शके १८४८ तारीख ३१-१२-१९२६ शुक्रवार रोजीं सकाळीं पुरा-तत्त्वभूषण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं धुळें येथें आपला देह ठेवला. भारतीय संस्कृतीचा निस्सीम अभिमान बाळगणारा त्यांच्या तोडीचा पुरुष विरळा. त्यांनीं आपलें तन, मन, धन, शब्दशः महाराष्ट्रकार्यीं लाविलें. मराठी भाषेची त्यांच्या इतकी एकनिष्ठ सेवा दुसऱ्या कोणींहि केली नाहीं, असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. इतिहाससंशोधनकार्याला स्वतःस सर्वस्वीं वाहून घेऊन महाराष्ट्राची त्यांनीं जी आमरण सेवा केली ती अपूर्व होय. त्यांची बुद्धि अचाट होती. आपल्या विद्वत्तेनें, कार्यैकनिष्ठेनें, स्वार्थत्यागानें, संन्यस्तवृत्तीनें त्यांनीं अखिल महाराष्ट्रास भूषविलें होतें. अशा महापुरुषाचें आणि आपल्या वरील त्यांच्या उपकारांचें स्मरण ठेवण्यासाठीं आणि त्यांचें महत्कार्य नेटानें पुढें चालविण्यासाठीं सर्व महाराष्ट्रवाङ्मयेतिहास-भक्तांनीं आस्थापूर्वक प्रयत्न केले पाहिजेत.

पुण्यास भारत-इतिहास-संशोधक-मंडळ कै. राजवाडे यांनीं च पुढाकारानें स्थापिलें त्या-च प्रमाणें धुळे मुक्कामीं हि त्यांचा निवास अलिकडे बरा च होई आणि तेथें च त्यांचें देहावसान हि झालें आणि त्यांचा अमोलिक साधनसंग्रह तेथेंच आहे आणि तसा तो सुरक्षित राहून राष्ट्राचे उपयोगी पडावा अशी तळमळ त्यांचे ठिकाणीं होती.

साहजिक च पुणें व धुळें या दोन स्थळीं अनुक्रमें (ता. ५-१-१९२७) आणि (ता. ९-१-१९२७) रोजीं नागरिकांच्या जाहीर सभा भरून राजवाडे स्मारकांच्या योजना हि प्रसिद्ध झाल्या आहेत. महाराष्ट्रांत यवतमाळ, नाशीक, मिरज, कऱ्हाड, मुंबई, सातारा, नगर, वगैरे स्थळींहून स्मारक त्वरित व्हावें म्हणून सूचना हि आल्या आहेत.

यामुळें उत्साह वाटून स्मारकाचें कार्य हा॰ ३ क्रिया॰हे. स्मारकाच्या योजनेचीं मुख्य अंगें येणें प्रमाणें योजिलीं आहेत:— (नी.शं

(१) इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ रा॰ "ज्याचें (म. -संशोधन-मंडळ, धुळें या संस्थेच्या हेतूप्रमाणें राजवाडे यांचा बहुमोल साधनसंग्रह त्यांचे इच्छेनुरूप धुळें मुक्कामीं सुरक्षित ठेवण्या-करितां राजवाडेसंशोधन-मंदिर नांवाची अदाह्य इमारत बांधून तेथें तो नीट लावून सुरक्षित ठेवणें.

(२) वरील संग्रहाची यादी करून ती प्रसिद्ध करावी आणि वरील संग्रह अभ्यासकांस योग्य अटींवर उपयोगास मिळण्याची व्यवस्था करणें, तसें च त्या संग्रहाचें संशोधन करून तीं साधनें योग्य संपादनसंस्कार करून प्रसिद्ध करणें इ. कार्यें करणें.

(३) राजवाडे यांच्या मुद्रित आणि अमुद्रित लिखाणांची आवृत्ति प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करणें.

—स्मारकग्रंथावलि, राजवाडे-स्मृतिदिन-पालन

जून १९

इत्यादि :

॰डळ-मंदिरांत राजवाडे-संग्रहशाळा बांधणें.

अनुक्रमणिका

( ६ ) भारत-इतिहास-संशोधन-मंडळांत आणि धुळें येथें स्थापावयाच्या राजवाडे-इतिहास-मंदिरांत आणि इतर योग्य स्थळीं राजवाडे यांचें तैलचित्र किंवा पुतळा वगैरे ठेवणें इ. इ. इ.

या कार्याला एक लक्ष रुपये तरी गोळा करावे असा हेतु आहे. कै. राजवाडे यांच्याच पुण्याईनें आणि आशीर्वादानें हा संकल्प आपण पुरा करूं, असा आम्हांस विश्वास वाटत आहे. या स्मारकनिधीचे हिशेब सर्व वेळोवेळीं प्रसिद्ध करूं. कै. राजवाडे हे राष्ट्रपुरुष होते व आम्हांस असा भरंवसा वाटतो कीं बृहन्महाराष्ट्रांतील सर्व विद्वान्, धनिक व कै. राजवाडे यांचे सर्व शिष्य, चहाते आणि भक्त या कामीं पूर्ण सहाय्य करून या योजनेला मूर्त स्वरूप आणून देतील.

धुळें येथें जें स्मारकमंदिर उभारण्यांत येणार आहे, त्या मंदिराचा रक्षकवर्ग पांच सभासदांचा असावा. या पांच सभासदांपैकीं तीन सभासद धुळयाच्या मंडळानें निवडावे व दान सभासद भारत-इतिहास-संशोधन-मंडळ पुणें या संस्थेनें निवडून द्यावे असें ठरलें आहे.

वर दर्शविल्या प्रमाणें स्मारक योजनेसंबंधीं सर्व कामें प्रो. वैजनाथ काशीनाथ ऊर्फ नानासाहेब राजवाडे, भारत-इतिहास-संशोधन-मंडळातर्फे रा. दत्तो वामन पोतदार व रा. दत्तोपंत आपटे व धुळें येथील राजवाडे-इतिहास-संशोधन-मंडळातर्फे रा. शंकर श्रीकृष्ण देव, रा. भास्कर वामन भट अशा एकंदर पांच गृहस्थांच्या मंडळानें करावीं असें सोईच्या दृष्टीनें ठरविण्यांत आलें आहे.

**वैजनाथ काशिनाथ राजवाडे** — **शंकर श्रीकृष्ण देव**
**दत्तो वामन पोतदार** — **भास्कर वामन भट**
**दत्तो विष्णु आपटे**

---

कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या स्मारकासंबंधीं वरील योजना आम्हांस पसंत असून त्या योजनेस मूर्त रूप देण्याचें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें कर्तव्य आहे असें आम्ही समजतो. तरी द्रव्यद्वारा या कार्यास सर्वांनीं ज्ञा पश्चि मदत करावी अशी आमची विनंति आहे.

माधवराव वि. किबे, इंदूर
गंगाधर ना. मुजुमदार, पुणें
कृष्णराव आनंदराव बारगळ जहागिरदार, तळोदे
आनंदराव नारायणराव सुर्वे, मुंबई
नारायण दामोदर सावरकर, मुंबई
महादेव वामन भट, मुंबई
जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, मुंबई
पांडुरंग केशव शिराळकर, कऱ्हाड
वासुदेव गणेश जोशी, पुणें
कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, सातारा
नारायण गोविंद चापेकर, बदलापूर
नारायण रामजी गुंजाळ, पुणें

मूर्तीला " ...री अणे, यवतमाळ
वैदिराज गोपाळराव भोसले, साकी
पांची श्री. दामोदर सातवळेकर, औंध
बाबा फुले, पुणें
दत्तात्र व्यंकटेश बेळवी, बेळगांव
गोपाळ जी गोगटे, भुसावळ
हरी विनायक पाटसकर, चाळीसगांव
विनायक परशुराम भागवत ,,
नारायण वंकट बु...
शंकर गणेश लवा तुलना वेन राजाशीं केलेला आ... घते
श्रीधर व्यंकटेश के प्रशस्तीमध्यें " वर्धमानसेसवो वेनाभिविजयो "
लक्ष्मण रामचंद्र पां...

नरसिंह चिंतामण केळकर, पुणें
लक्ष्मण बळवंत भोपटकर, ,,
बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर
यशवंत खुशाल देशपांडे, अमरावती
बाळकृष्ण गणेश खापर्डे, अमरावती
यादव माधव काळे, बुलढाणा
रामचंद्र विष्णु महाजनि, अकोला
श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, जळगांव
जनार्दन सखाराम करंदीकर, पुणें
...ंत विनायक पटवर्धन, पुणें

---